टाकील अगर आमच्या (स्थिती)वर दया करील; तर कोणी आहे कीं, जो नास्तिकांस (परलोकींच्या) दुःखकारक शिक्षेपासून आश्रय देऊं शकेल ? २८. (हे पैगंबरा ! या लोकांस) सांग कीं, तोच परमदयाळु (परमेश्वर) होय; आम्हीं त्याचाच विश्वास धरिला आहे आणि त्याच्यावरच आम्हीं भरंवसा ठेवितों; तथापि लवकरच तुम्हांस माहित होऊन जाईल कीं, (आम्हां उभयपक्षांत) कोण बोलूनचालून चुकींत होता ? २९. (हे पैगंबरा ! या लोकांस) सांग कीं, बरें पाहा तर (खरें कीं, हें) तुमचें पाणी (जें तुम्हीं पितां तें) जर (जमिनीच्या) तळास बसून सुकून जाईल तर कोण तुम्हांसाठीं (स्वच्छ) पाण्याचे[१] झरे आणून वाहवील ? ३०

(१) 'तफसीरे जाहिदी'मध्यें लिहिलें आहे कीं एक मुल्ला–पंतोजी आपल्या शिष्यांस हें महावाक्य पाठ करवीत होता; कीं एक नास्तिक हें ऐकून 'बिल्-मअवले वल मोईन' म्हणजे हत्यारांनीं व मदतगाराद्वारें पाणी भरून भरून आणूं असें बोलत निघून चालता झाला. रात्रीं आंधळा झाला व त्यानें एक आकाशवाणी ऐकिली कीं, हें तुझ्या नेत्राचें पाणी म्हणजे तेज नष्ट झालें तें तूं पुन्हां आण पाहूं ? सकाळीं उठून पाहतो आहे, तों आंधळा आहे; तेव्हां तो आपलें तोंड बडवून घेऊं लागला. पण सगळें व्यर्थ ! म्हणून मनुष्यानें नित्य परमेश्वरास भीत राहावें हेंच उचित आहे.

# अध्याय ६८ वा.

## सूरतुल्-कलम्.


हा अध्याय मक्केंत प्रकट झाला. यांत ५२ आयात–महावाक्यें आहेत. याचें नांव 'सूरतुल्–कलम' म्हणजे लेखणीचें प्रकरण असें पडण्याचें कारण पुढील पहिल्या वाक्याच्या टीपेंत पाहा.



परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराच्या नांवानें (मी आरंभ करितों)

न. (नून. हे पैगंबरा !) लेखणीची शपथ, आणि लोकांच्या लिहि-
ण्याची शपथ; १. कीं, तूं आपल्या पालनकर्त्याच्या कृपेनें (नास्तिक
म्हणतात तसा केव्हांहि) वेडा नाहींस. २. आणि निःसंशय (पैगंबरी-
संदेश पोहोंचविण्याच्या मोबदल्यांत) तुला (असा) मोबदला (मिळणार)
आहे (कीं, ज्याची परंपरा कधींहि) तुटणारच नाहीं. ३. आणि निःसं-
शय तुझी नीतिमत्ता अर्थात् मोठ्या (उच्च)पायरीची होय. ४. तर
लवकरच (तूंहि) पाहून घेशील आणि (हे नास्तिकहि) पाहून घेतील,५.
कीं, तुम्हांपैकीं कोणाला वेड आहे ? ६. (हे पैगंबरा !) जे लोक पर-
मेश्वराच्या मार्गाहून भटकून गेले आहेत त्यांना निःसंशय तुझा पालन-
कर्ताच खूप जाणतो; आणि जे सन्मार्गावर आहेत त्यांनाहि तोच खूप
जाणतो. ७. तर (हे पैगंबरा ! तूं कोठें) पाखंडी म्हणणारांच्या कह्यांत
येऊं नकोस. ८. हे तर हेंच इच्छितात कीं, तूं नरम पडशील तर हेहि
नरम पडतील. ९. आणि तूं कोणा अशा(अजागळा)च्या कह्यांतहि
येऊं नकोस कीं, जो भारी शपथा वाहतो (व) मानहानि झालेला
आहे; १०. (लोकांची) अब्रू घेतो, (इकडून तिकडे व तिकडून इकडे)
चहाड्या लावीत फिरतो; ११. चांगल्या कामापासून (लोकांस)

(१)मनुष्याचा स्वभावच असा आहे कीं, तो नेहमींच्या व्यावहारिक गोष्टींचें मुळीच मनन करीत नाहीं. नाहींतर, लेखणी आणि लिहिणें ही अशी एक चमत्कारिक व उपयुक्त युक्ति होय कीं, आज तागाईत अशी उत्तम युक्ति कोठेंच व कोणीहि काढलेली नाहीं; आणि ज्याला परमेश्वरानें लिहिणेंची पद्धति प्रथम सुचविली असेल, खरोखरींच त्याच्यापासून परमेश्वरानें असें काम घेतलें कीं, ज्यावर सर्व जगिक व पारमार्थिक व्यवहारांची मदार येऊन ठरते. म्हणून लेखणी व लिहिणें ह्या दोन्हींहि फार भारदस्त व महत्वाच्या वस्तु होत, अतएव परमेश्वरानें त्यांची शपथ वाहिली आहे.

(२) म्हणजे नास्तिक इच्छितात कीं, तुम्हीं मूर्तीपूजेस वाईट म्हणूं नका; म्हणजे तेहि तुमच्या धर्माचा इतका विरोध करणार नाहींत.

**रोखींत राहतो, (भक्ति–) मर्यादेचें उल्लंघन करितो, दुष्ट आहे, १२. निष्ठुर आहे; (आणि) या (दोषां) उपरांत, जो कम अस्सलहि आहे; १३. तो धनसंपन्न व (पुष्कळ) पुत्रसंपन्न आहे म्हणून, १४. जेव्हां आमचीं महावाक्यें त्याला वाचून ऐकविलीं जातात तेव्हां तो म्हणूं लागतो कीं, (ह्या) पूर्वीच्या लोकांच्या भाकडकथा होत. १५. (त्याला जरा दम धरूं द्या;) आम्हीं लवकरच (त्याच्या) नाकाडावर डाग लावून टाकूं. १६. (हे पैगंबरा!) ज्याप्रमाणें आम्हीं (एका) बागेवाल्यांस अजमाविलें होतें त्याचप्रमाणें आम्हीं या(नास्तिकां)सहि अजमाविलें आहे; कीं, त्या बागेवाल्यांनीं शपथ वाहून वाहून म्हटलें कीं, सकाळ होतांच आम्हीं याचीं फळें अवश्य तोडून घेऊं. १७. आणि (त्यांना इतकी खात्री होती**

(१) एक अर्थ हा जो आह्मीं भाषांतरांत घेतला आहे तो; आणि दुसरा अर्थ हाहि होऊं शकतो कीं, 'खैर' म्हणजे द्रव्य आणि 'मन्नाअ' ह्मणजे रोखणारा; तर द्रव्याचा रोखणारा म्हणजे कंजूष जो परमार्थांत देत नाहीं तो.

(२) हीं महावाक्यें एक नास्तिक **वलीद** बिन **मुगीरह** याच्या संबंधानें प्रकट झालीं आहेत, कीं तो फारच दुष्ट व उपद्व्यापी असा होता. ज्या बाबतींत परमेश्वरानें त्याला दोष दिला आहे त्यापासून मनुष्याला पाहिजे कीं त्यानें जपून राहावें. यांत आलेल्या 'खर्तूम' या शब्दाचा अर्थ सोंड असा आहे. येथें हा शब्द तिरस्कारदर्शक अर्थांत माणसांसाठीं वापरण्यांत आला आहे; ह्मणून त्याचा अर्थ 'नाकाड' किंवा नाकोटा हाच उचित आहे. खरें पाहूं जातां, **बद्रचे** लढाईंत **वलीदच्या** नाकावर जखमहि झाली होती व तिचा डाग होता. यास्तव त्याच्या संबंधानें हें भविष्य पुरें होऊन चुकलें.

(३) हजरत **अबदुल्ला** बिन **अब्बास** यांनीं असें निरुपण केलें आहे कीं, **यमन** प्रांतांत **सनूआ** शहरापासून तीन कोसांच्या अंतरावर वाटेवरच एक बाग होता. त्याला 'दखान' असें म्हणत असत. या बागेचा दानशूर व वृद्ध धनी फळें तोडण्याचे वेळीं उत्तमांत उत्तम फळें गोरगरीब व भिक्षुकांस देई व दहावा हिस्सा परमेश्वराप्रीत्यर्थ काढून गरीबांस वाटी. त्यांच्यानंतर त्याचे मुलगे त्या बागेचे वारसदार बनले. त्यांनीं दारिद्र्याच्या भीतीनें कृपण होऊन सर्व दानधर्म बंद केला; आणि सकाळींच जाऊन भिक्षुकांच्या येण्याच्या आधींच फळें तोडून आणावीं असा बेत केला; तों बागेवर रातोरात अस्मानी आपत्ति येऊन पडली व सारा बाग उजाड झाला.

कीं,) 'परमेश्वर इच्छील तर' हा अपवादहि त्यांनीं लाविला नाहीं. १८. तर हे निजलेचे निजलेच राहिले कीं, तुझ्या पालनकर्त्याकडून एक (आकस्मिक) विपत्ति (ओढवली व या टोंकापासून त्या टोंकापर्यंत) बागेवर फिरून गेली; १९. आणि सकाळ होतां होतां, तो बाग असा (खालीं) होऊन गेला कीं, जणूं कोणी सारींच फळें तोडून घेऊन गेला. २०. (आणि इकडे) या लोकांनीं सकाळ होतां होतां एकमेकांस आवाज दिला, २१. कीं जर तुम्हांस फळें तोडावयाचीं असतील, तर अगदीं सकाळींच आपल्या बागेंत जाऊन पोहोंचा. २२. सारांश, (ते सर्व लोक) रवाना झाले आणि आपसांत हळूहळू बोलत जात होते; २३. कीं, (पाहा हो!) आज कोणी गोरगरीब तुम्हांपर्यंत बागेच्या आंत शिरतां कामा नये; (नाहीं तर त्याला कांहीं द्यावें लागेल). २४. (तात्पर्य आपल्या मनांत) हें समजून कीं, बस्स जातांच फळें तोडून घेऊं; मोठ्या तयारीनें अगदीं सकाळींच जाऊन पोहोंचले. २५. मग जेव्हां त्यांनीं बागेला पाहिलें तेव्हां (तो असा उजाड पडला होता कीं त्यांनीं ओळखिलेंहि नाहीं व) म्हणूं लागले कीं, असो नसो, आम्हीं (वाट) भुलून गेलों. २६. (मग विचार करून बोलले, नाहीं वाट भुललों नाहीं;) किंबहुना आमचें नशीब फुटून गेलें. २७. त्यांच्यांत जो उत्तम (मनुष्य) होता तो म्हणूं लागला, कां मी तुम्हांस सांगित नव्हतों कीं तुम्हीं (परमेश्वराची स्तुति व) पवित्रता कां म्हणून करीत नाहीं? २८. (तथापि ते आतां) बोलूं लागले कीं आमचा पालनकर्ता परम पवित्र होय; निःसंशय आम्हींच तकशीरवार होतों. २९. (आणि) ते आतां एकमेकांकडे वळून परस्पर दोष देऊं लागले. ३०. (अखेर सर्व) बोलले; अरेरे! आमचें दुर्दैव! निःसंशय आम्हींच (भक्ति–) मर्यादेचें उल्लंघन केलें होतें. ३१. नवल नव्हे कीं आमचा पालनकर्ता या(बागे)च्या बदलीं आम्हांला याहून उत्तम (बागा) देईल. (आतां) आम्हीं आपल्या पालन-

(१) कुराणांत 'हर्स' आहे; त्याचा अर्थ शेत होतो. तर येथें एक तर बागेला शेत म्हटलें असावें; कीं त्या लोकांचीं शेतें हे बागच होते. अथवा बागेच्या आंतच्या आंत शेतेंहि असतील.

(२) अथवा दुसरा अर्थ, 'गोरगरीबांस प्रतिबंध करण्यावर कंबर बांधून अगदीं सकाळींच जाऊन पोहोंचले' असाहि होऊं शकतो.

कर्त्याकडे आस्थापूर्वक वळलों आहों. ३२. (हे पैगंबरा! जे लोक अनुपकारी होतात त्यांना ह्या लोकीं) अशीच शिक्षा होत असते. आणि परलोकींची शिक्षा तर (याहूनहि) फारच थोर होय; जर (सांप्रत कालचे नास्तिक) समजत असते (तर बरें होतें)! ३३. निःसंशय, (परमेश्वराला) भिऊन वागणारांसाठीं त्यांच्या पालनकर्त्यापाशीं (स्वर्गाचे) ऐषआरामाचे बाग होत. ३४. कां आम्हीं (आपल्या) आज्ञाधारकांस पाप्यांसारखें बनवून टाकूं? ३५. तुम्हां लोकांस काय (होऊन गेलें) आहे, कसे (वेडगळ) हुकूम लावीत असतां? ३६. कां तुम्हांपाशीं एखादें (दिव्य) पुस्तक आहे कीं त्यांत वाचीत असतां? ३७. कीं जें तुम्हीं पसंत कराल तेंच तुम्हांला पर[1]लोकीं (प्राप्त) होईल? ३८. अगर कां तुम्हीं आम्हांपासून पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत चालल्या जातील अशा शपथा घेऊन ठेविल्या आहेत कीं तुम्हीं ज्या वस्तूंची फरमास कराल तीच तुम्हांसाठीं (परत्रीं हजर केली जाईल)? ३९. (हे पैगंबरा!) या लोकांस पूस कीं यांच्यांतून कोण ह्याचा जिम्मेदार आहे? ४०. किंवा यांनीं (परमेश्वराचे) सरकतदार ठरवून ठेविले आहेत (व ते जिम्मेदार बनतात)? मग जर हे (आपल्या दाव्यांत) खरे आहेत तर त्यांनीं आपल्या सरकतदारांस आणून हजर करावें. ४१. ज्या दिवशीं पडदा[2] उचलला जाईल आणि लोक साष्टांग नमस्कारासाठीं

(१) येथें 'फीहे' यांतील 'हे' हें सर्वनाम परलोकाकडे लाविलें तर वरील ३४ वाक्यांतल्या 'त्यांच्या पालनकर्त्यापाशीं' या शब्दांच्या अनुरोधानें लावितां येतो. आणि आम्हीं जो अर्थ केला आहे तोच अर्थ होतो. पण जर हें सर्वनाम 'पुस्तका'कडे लावलें तर हा अर्थ होईल कीं, त्यांत वाचीत असतां (वं) त्यांत (लिहिलें) आहे कीं जें तुह्मीं पसंत कराल (तेंच) तुम्हांला (परलोकीं) मिळेल.

(२) या महावाक्याचा शब्दशः अर्थ म्हटला म्हणजे 'ज्या दिवशीं पायाची पोटरी उघडी केली जाईल' असा होय. हा अरबांच्या बोलण्याचा एक संप्रदाय आहे; आणि पोटरी उघडणें ह्मणजे अडचण किंवा संकट ओढवणें असा अर्थ होतो. कारण एखादें मोठें काम करावयाचें असलें ह्मणजे मनुष्य आपली तुमान चढवितो व तें काम करण्यास प्रवृत्त होतो. अगर नदी उतरावयाची असली म्हणजे कपडे वर उचलून घेतो. कित्येक भाष्यकार ह्मणतात कीं, मूळ गोष्ट उघडकीस येणें असा अर्थ होतो. म्हणून आम्हीं 'पडदा उचलला जाईल.' असें भाषांतर केलें. हें जें म्हटलें कीं साष्टांग नमस्कार करूं शकणार नाहींत, त्यासंबंधानें हजरत पैगंबरसाहेबांचें एक वचन आहे कीं, नास्तिकांची पाठ तक्ता होऊन जाईल व त्यांच्यानें नमवलें जाणार नाहीं.

बोलाविले जातील, तेव्हां ते (साष्टांग नमस्कार) करूं शकणार नाहींत. ४२. (लज्जेमुळें) त्यांचे डोळे नमलेले असतील (आणि) हीनता त्यांच्या(चेहऱ्या)वर पसरलेली असेल. आणि (जगांत) त्यांना साष्टांग नमस्काराकडे बोलाविलें जात होतें व त्यावेळीं हे लोक भले-चंगेहि होते; (परंतु ते खोडसाळपणामुळें नमस्कार करीत नव्हते.) ४३. तर (हे पैगंबरा !) मला व जे लोक (माझ्या) या वाणीस पाखंड म्हणतात त्यांस (आपापल्या स्थितीवर)सोडून दे; (मी त्यांना पाहून घेईन.) आम्हीं, त्यांस जाणीवहि होणार नाहीं अशा रीतीनें हळु हळु त्यांना (नरकाग्नीकडे) ओढीत जाऊं. ४४. आणि मी त्यांना ढील देत चाललों जात आहें; निःसंशय माझा डाव (मोठा) पक्का (डाव) होय; (कीं त्याची तोडहि होऊं शकत नाहीं.) ४५. (हे पैगंबरा !) कां तूं यांजपाशीं (संदेश पोंचविण्याबद्दल) कांहीं वेतन मागतोस, कीं हे त्या(च्या भूर्दंडाचे ओझ्या)नें दबूत जात आहेत ? ४६. अथवा यांच्यापाशीं गैबी बातम्या (येत) आहेत व हे (त्या) लिहून घेत जातात ? ४७. तर (हे पैगंबरा!) तूं आपल्या पालनकर्त्यांच्या हुकुमाची वाट पाहत मुकाट्यानें बैस; आणि 'जुन्नुन'[1] (म्हणजे 'यूनुस')सारखा (मनोदुर्बल) होऊं नकोस; कीं त्यानें संतप्त होत्साता (परमेश्वराला) हाक मारिली.४८. जर त्याच्या पालनकर्त्यांची कृपा त्याची मदत न करते, तर त्याचे बुरे हाल होऊन तो उघड्या मैदानांत फेंकून दिला गेला असता. ४९. परंतु त्याच्या पालनकर्त्यानें त्याला निवडून घेतलें व त्याला (आपल्या) पवित्राचरणी सेवकांत (पुन्हां सामिल) केलें. ५०. आणि (हे पैगंबरा !) नास्तिक जेव्हां कुरआन् ऐकितात तेव्हां असें दिसून येतें कीं ते तुला गुरकावून[2] पाहून पाहून (परमेश्वराच्या मार्गांहून) भटकवून टाकतील; आणि ते म्हणतात कीं हा (गृहस्थ) तर अर्थात (एक) वेडा होय.५१. आणि वास्तविक पाहतां, हें (कुराण जें तूं त्यांस ऐकवितोस तें) आलमदुनियेच्या (लोकां)साठीं एक बोध होय एवढेंच. ५२.

(१) 'साहेबुल्–हूत' व 'जून्नून' या दोहोंचा अर्थ मासेवाला असा होतो. परंतु त्याचा अर्थ मासे विकणाराहि होतो. आणि वास्तविक पाहतां 'जुन्नून' हें हजरत यूनुस पैगंबराचें नांव पडून गेलें आहे. कां कीं त्यांस माशानें गिळून टाकलें होतें.

(२) गुरकावून पाहणें ह्मणजे संताप व्यक्त करणें किंवा नजरेनें भारणें.

# अध्याय ६९ वा.

## सूरतुल्--हाक्कः



हा अध्याय मक्केंत प्रकट झाला. यांत ५२ आयात म्हणजे महावाक्यें आहेत. मूळशब्द 'अल्--हाक्कतो,' हें पुनरुत्थानाच्या अनेक नावांपैकीं एक नांव होय. या शब्दाचा धात्वार्थ अवश्य घडून येणें एवढा नसून, खरें करून दाखविणें असाहि होतो. म्हणून मेलेल्यांचें फिरून उठणें, त्यांच्यापासून त्यांच्या कर्मांचा जाब पुसला जाणें आणि त्याप्रमाणें त्यांस इनाम मिळणें किंवा शिक्षा होणें वगैरेविषयीं इहलोकीं मनुष्यांस ज्या शंका येतात त्यांचें सत्यत्व पटविलें जाईल तो दिवस, असेंहि कित्येकांचें मत आहे. म्हणून सुरतुल्--हाक्कःम्हणजे अपरिहार्य किंवा खचित घडून येणाऱ्या दिवसाचें प्रकरण हें नांव पडलें.

**परम दयाळू (आणि ) कृपाळू परमेश्वराचे नांवानें (मी आरंभ करितों.)**

**खचित घडून येणारें; १. (आणि) खचित घडून येणारें आहे काय?२. आणि (हे पैगंबरा !) तूं काय समजलास कीं, खचित घडून येणारें आहे काय ? (तें एक आकस्मिक संकट होय कीं, सर्वांस हळहळवून सोडील; म्हणजे पुनरुत्थान). ३. 'समूद' आणि 'आद'या(दोघां)नीं (त्या) हळहळविणाऱ्या(संकटा)स खोटें म्हटलें; ४. तथापि 'समूद' तर (एका भयंकर) गर्जने(च्या कडाक्या)नें नष्ट केले गेले. ५ आणि (राहिले) 'आद;' तथापि तेहि एका झपाट्याच्या जोरदार वावटळानें उध्वस्त केले गेले; ६. कीं बरोबर सात रात्री व आठ दिवस ती (वावटळ) परमेश्वरानें त्यांच्यावर चालू ठेविली. तर (हे वाचक-श्रोत्या !) तूं (त्या) लोकांस त्या (वावटळीं)त असे पछाडलेले पाहतास कीं, जशा पोकळ पुळपुळीत खजुरीच्या मुळ्या. ७. मग आतां तुला त्यांच्यांतून कोणीहि बाकी राहिलेला दिसून येतो काय ? ८. आणि 'फिरऔन' व ज्या (जनता)**

त्याच्यापूर्वी होऊन गेल्या आहेत त्या व उलटलेल्या वस्त्यांचे रहिवासी (ह्मणजे 'लूत'चे लोक,ह्या सर्वांनीं मोठमोठीं) पापें केलीं. ९. मग(त्यांच्याकडे पैगंबर पाठविले गेले व) त्यांनीं आपल्या पालनकर्त्याच्या पैगंबराचा (ह्मणजे जो त्यांजकडे पाठविला गेला होता त्याचा) आज्ञाभंग केला म्हणून त्यानेंहि त्यांस फार सक्तीनें पकडलें. १०. (लोकांनों! 'नूह'च्या काळीं)जेव्हां पाण्याचें तुफ़ान उसळलें, तेव्हां आम्हींच तुम्हांला (म्हणंजे तुमच्या वडिलांना) गलबतांत स्वार करून घेतलें होतें; ११. कीं या(वृत्तांता)स आह्मीं तुम्हांसाठीं एक यादगिरी बनवून ठेवावी आणि ज्यां (च्या) कानास (परमेश्वरानें याद) ठेवण्याची पात्रता दिली आहे त्यांनीं तो याद ठेवावा;१२ मग जेव्हां (हे पैगंबरा !) तुतारींत (पहिली) एक फुंक मारली जाईल; १३. आणि जमीन व पर्वत या दोहोंस उचलून (व आदळून) एका फटक्यासरशीं त्यांचे तुकडे तुकडे केले जातील; १४. तेव्हां (पुनरुत्थान)जें खचित घडून येणारें तें त्या दिवशीं घडून येईल. १५. आणि आकाश फाटून जाईल व तें त्या दिवशीं फारच पोंचट (फुसफुशीत) होऊन जाईल. १६. आणि त्याच्या किनाऱ्यांवर दूत असतील; आणि त्यादिवशीं तुझ्या पालनकर्त्याच्या सिंहासनास आठ[1] (दूत) आपल्यावरती उचलून धरतील. १७. (लोकांनों !) त्या दिवशीं तुम्हीं (परमेश्वरापुढें) रुजू केले जाल (व, तुमचें कोणतेंच गूढ (परमेश्वरापासून) गुप्त राहणार नाहीं. १८. तर ज्याला त्याचें (कर्म)पत्रक त्याच्या उजव्या हातांत दिलें जाईल, तो (खुशीखुशीनें लोकांस) म्हणील कीं घ्याहो ! (हें) माझें (कर्म)पत्रक तर वाचा. १९. मला तर (इहलौकिक आयुष्यांत) खात्री होती कीं (एके दिवशीं) माझा हिशेब (म्हणजे कर्मपट)मला मिळेल;(तो मिळाला.)२०. तर तो (गृहस्थ मनस्वी) सुखावह आयुष्यांत असेल; २१. (म्हणजे) परात्पर सुखोद्यानांत, २२. कीं ज्याचीं फळें (अशीं) लोंबकलेलीं असतील (कीं पाहिजे तर आपल्या जागीं बसल्या बसल्या तोडावींत. व त्यांना परवानगी असेल,)२३.कीं गुदस्त दिवसांत(म्हणजे जगांत)तुह्मीं जीं (कर्में करून पुढील सामग्रीदाखल)पाठविलीं होतीं त्यांच्या मोबदला खा व प्या

(१) आठची संख्या ईश्वरनियमित आहे. आपल्या प्रयोजनांस तोच खूब जाणतो. त्यांत आम्हांस डोकेफोड करण्याचें कारण नाहीं.

व (तें तुमच्या) अंगीं लागो. २४. आणि ज्याचें (कर्म)पत्रक त्याच्या डाव्या हातांत दिलें जाईल; तो म्हणेल, मला जर माझें (कर्म)पत्रक मिळालें नसतें तर बरें होतें! २५. आणि (तसाच) मला आपला (हा) हिशेबहि न कळता कीं काय आहे (व काय नाहीं)! २६. मरणानें (माझ्या अस्तित्वाचा) अंत होऊन गेला असता तर बरें होतें! २७. माझें द्रव्य माझ्या (कांहींहि) कामा आलें नाहीं. २८. मजपासून माझी सत्ता नष्ट झाली. २९. (मग आम्हीं त्याच्या संबंधानें हुकूम देऊं कीं) याला धरा व याच्या गळ्यांत मानखोडा घाला. ३०. तदनंतर (ओढीत ओढीत नेऊन)याला 'जहन्नम'मध्यें ढकलून द्या; ३१. मग जिची लांबी गजांनीं सत्तर[1] गज होईल अशा सांकळींत त्याला खूप जखडून टाका. ३२. (कारण) ह्यानें महान परमेश्वराचा विश्वास धरिला नव्हता. ३३. आणि (आपण खाऊं घालणें तर एकिकडेच, इतरांसहि) गोरगरिबांस खाऊं घालण्याचें उत्तेजन देत नव्हता. ३४. तर आज येथें याचा कोणीहि दोस्तदार नाहीं; ३५. आणि पूवा(च्या पाण्या)शिवाय याला (आणखी कांहीं) खावयासहि नाहीं. ३६. (आणि) हें खाणें केवळ पापीच खातील. ३७. तर (लोकांनो!) जी वस्तु तुम्हांस दिसते व जी वस्तु तुम्हांस दिसत नाहीं (उदाहरणार्थः—जिन्न–दैवत, दूत वगैरे) मी तर सर्वांचीच शपथ वाहतों आहे (ना[2]). ३८—३९. कीं हें (कुराण) निःसंशय एका सन्माननीय दूताची[3] (आणलेली ईश्वर) वाणी होय. ४०. आणि ही कोणा कवीची (रचिलेली) गोष्ट नव्हे. परंतु तुम्हीं लोक फारच कमी विश्वास धरितां. ४१.

(१) येथें एक तर, सत्तरच्या संख्येचें गूढ आम्हांस जाहीर केलें गेलें नाहीं याचें कांहीं तरी खास कारण असावें; किंवा फक्त लांबीच उद्दिष्ट असावी. कारण अरबी भाषेंत केवळ संख्याबाहुल्य दाखविण्यासाठींहि सत्तर हा शब्द वापरला जातो.

(२) (ना) हा शब्द एकाद्या गोष्टीला जोर देण्यासाठींहि बोलतात. उदाहरणार्थ बसाना यांत बसण्याच्या अर्थाचें दृढीकरण होतें.

(३) 'रसूले–करीम' म्हणजे सन्माननीय दूत म्हणजे जिब्रील किंवा पवित्र आत्मा या अर्थींच येथें व इतरत्रहि आलेला आहे.

आणि (तसेंच) हें कोणा भविष्य करणाऱ्या(मांत्रिका)चें बोलणें नव्हे; परंतु तुम्हीं लोक फारच कमी मनन करितां. ४२. (ही) सकल जगांच्या पालनकर्त्याकडून प्रकटलेली (वाणी) होय. ४३. आणि जर (पैगंबरानें बळेंच) एखादी गोष्ट आमच्या संबंधानें घडली असती; ४४. तर अर्थात् आम्हीं त्याचा उजवा हात धरून, ४५. त्याची मान[१] उडवून टाकिली असती. ४६. आणि तुम्हांपैकीं कोणीहि (आम्हांस) त्यापासून प्रतिबंध न करूं शकता. ४७. आणि कांहीं संशय नाहीं कीं हें (कुराण परमेश्वराला) भिऊन वागणारांसाठीं एक बोध होय. ४८. आणि आम्हांस पक्कें माहित आहे कीं, तुम्हांपैकीं (कित्येक यास) पाखंड म्हणणारेहि होत. ४९. आणि यांत कांहीं संशय नाहीं कीं हें नास्तिकांसाठीं खेद[२]-(प्रद) होय. ५०. आणि यांतहि संशय नाहीं कीं हें निश्चयानें सत्य होय. ५१. तर (हे पैगंबरा!) तूं आपल्या महान् पालनकर्त्याच्या नांवाचें पावित्र्य गाण्यांत लागून अस. ५२.

(१) 'वतीन' ही एक शीर आहे; ती मानेंतून होऊन जाते. तिचा रुधिराच्या मुख्य धमन्यांशीं संबंध असतो. ती कापली गेली कीं प्राण निघून जातो. या वाक्याचा शब्दशः अर्थ तर असा होतो कीं, 'आम्हीं त्याच्या रुधिराची शीर कापली असती. भाषेस अनुसरून आम्हीं परिणामवाचक अर्थ घेतला आहे.

(२) खेदप्रद ह्मणजे परत्रीं नास्तिकांस मोठा खेद होईल कीं आपण कुराणावर कां विश्वास ठेविला नाहीं ?



# अध्याय ७० वा.

## सूरतुल्–मआरिज.



हा अध्याय मक्केंत प्रकट झाला. यांत ४४ महावाक्यें आहेत. याला 'सूरतुल्–मआरिज' म्हणजे पायऱ्यांचें किंवा वर चढणाऱ्या जिन्यांचें प्रकरण असें नांव देण्याचें कारण हें कीं, परमेश्वर अत्युच्च असून त्यापावेतों पोंचण्याच्या पायऱ्या व जिने अनेक आहेत; अथवा दुसऱ्या शब्दांनीं म्हणावयाचें म्हणजे परमेश्वरा-संबंधाचें ज्ञान पायपायरीनें प्राप्त होतें.

**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराच्या नांवानें (मी आरंभ करितों.)**

**कोणा एका (अदूरदर्शी) दरखास्त करणारानें येणाऱ्या शिक्षेविषयीं दरखास्त केली; १. (कीं ती) नास्तिकांवर (यावी), अशी कीं तिला कोणी टाळणारहि नाहीं; २. (ती अशा) पायऱ्यावाल्या परमेश्वरा(च्या हुकमा)नें (घडून येईल); ३. कीं ज्या (पायऱ्यां)च्या (वाटां)द्वारें देव-दूत व आत्मा (म्हणजे 'जिब्रील') त्याच्याकडेस चढून जातात; (पुनरुत्था-नाच्या) अशा एका दिवशीं (ती घडून येईल) कीं ज्याचा अंदाज पन्नास हजार वर्षांचा होईल. ४. तर (हे पैगंबरा !) तूं (या लोकांच्या छळ-णुकीस) चांगल्या प्रकारें सहन करून (मुकाट्यानें) बैस. ५. हे लोक तर पुनरुत्थानाच्या दिवसास दुरापास्त समजतात. ६. आणि आम्हीं त्याला (केवळ संभवनीयच नाहीं) तर जवळ पाहतों आहों. ७. त्या दिवशीं आकाश (तर असें लाल) होऊन जाईल कीं, जसें वितुळलेलें तांबें; ८. आणि पर्वत (असे उडत) असतील कीं, जशी रंगीबेरंगी लोंकर. ९. आणि कोणी आप्त (दुसऱ्या)कोणा आप्तास विचारणार (देखील) नाहीं; १०. (व जरी) ते एकमेकांस दाखविले जातील (तरी देखील). पापी असें इच्छील कीं, त्या दिवसाचे शिक्षेबद्दल आपले मुलगे (खंडादाखल) देऊन सुटतां येईल (तर बरें होईल). ११. आणि(तशीच)**

**आणि (तसेंच) हें कोणा भविष्य करणाऱ्या(मांत्रिका)चें बोलणें नव्हे; परंतु तुम्हीं लोक फारच कमी मनन करितां. ४२. (ही) सकल जगांच्या पालनकर्त्याकडून प्रकटलेली (वाणी) होय. ४३. आणि जर (पैगंबरानें बळेंच) एखादी गोष्ट आमच्या संबंधानें घडली असती; ४४. तर अर्थात् आम्हीं त्याचा उजवा हात धरून, ४५. त्याची मान उडवून टाकिली असती. ४६. आणि तुम्हांपैकीं कोणीहि (आम्हांस) त्यापासून प्रतिबंध न करूं शकता. ४७. आणि कांहीं संशय नाहीं कीं हें (कुराण परमेश्वराला) भिऊन वागणारांसाठीं एक बोध होय. ४८. आणि आम्हांस पक्कें माहित आहे कीं, तुम्हांपैकीं (कित्येक यास) पाखंड म्हणणारेहि होत. ४९. आणि यांत कांहीं संशय नाहीं कीं हें नास्तिकांसाठीं खेद[2]-(प्रद) होय. ५०. आणि यांतहि संशय नाहीं कीं हें निश्चयानें सत्य होय. ५१. तर (हे पैगंबरा!) तूं आपल्या महान् पालनकर्त्याच्या नांवाचें पावित्र्य गाण्यांत लागून अस. ५२.**

---

(१) 'वतीन' ही एक शीर आहे; ती मानेंतून होऊन जाते. तिचा रुधिराच्या मुख्य धमन्यांशीं संबंध असतो. ती कापली गेली कीं प्राण निघून जातो. या वाक्याचा शब्दशः अर्थ तर असा होतो कीं, 'आम्हीं त्याच्या रुधिराची शीर कापली असती. भाषेस अनुसरून आम्हीं परिणामवाचक अर्थ घेतला आहे.

(२) खेदप्रद ह्मणजे परत्रीं नास्तिकांस मोठा खेद होईल कीं आपण कुराणावर कां विश्वास ठेविला नाहीं ?



# अध्याय ७० वा.

## सूरतुल्–मआरिज.



हा अध्याय मक्केंत प्रकट झाला. यांत ४४ महावाक्यें आहेत. याला 'सूरतुल्–मआरिज' म्हणजे पायऱ्यांचें किंवा वर चढण्याच्या जिन्यांचें प्रकरण असें नांव देण्याचें कारण हें कीं, परमेश्वर अत्युच्च असून त्यापावेतों पोंचण्याच्या पायऱ्या व जिने अनेक आहेत; अथवा दुसऱ्या शब्दांनीं म्हणावयाचें म्हणजे परमेश्वरा-संबंधाचें ज्ञान पायपायरीनें प्राप्त होतें.

परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराच्या नांवानें (मी आरंभ करितों.)

कोणा एका (अदूरदर्शी) दरखास्त करणारानें येणाऱ्या शिक्षेविषयीं दरखास्त केली; १. (कीं ती) नास्तिकांवर (यावी), अशी कीं तिला कोणी टाळणारहि नाहीं; २. (ती अशा) पायऱ्यावाल्या परमेश्वरा(च्या हुकमा)नें (घडून येईल); ३. कीं ज्या (पायऱ्यां)च्या (वाटां)द्वारें देव-दूत व आत्मा (म्हणजे 'जिब्रील') त्याच्याकडेस चढून जातात; (पुनरुत्था-नाच्या) अशा एका दिवशीं (ती घडून येईल) कीं ज्याचा अंदाज पन्नास हजार वर्षांचा होईल. ४. तर (हे पैगंबरा !) तूं (या लोकांच्या छळ-णुकीस) चांगल्या प्रकारें सहन करून (मुकाट्यानें) बैस. ५. हे लोक तर पुनरुत्थानाच्या दिवसास दुरापास्त समजतात. ६. आणि आम्हीं त्याला (केवळ संभवनीयच नाहीं) तर जवळ पाहतों आहों. ७. त्या दिवशीं आकाश (तर असें लाल) होऊन जाईल कीं, जसें वितुळलेलें तांबें; ८. आणि पर्वत (असे उडत) असतील कीं, जशी रंगीबेरंगी लोंकर. ९. आणि कोणी आप्त (दुसऱ्या)कोणा आप्तास विचारणार (देखील) नाहीं; १०. (व जरी) ते एकमेकांस दाखविले जातील (तरी देखील). पापी असें इच्छील कीं, त्या दिवसाचे शिक्षेबद्दल आपले मुलगे (खंडादाखल) देऊन सुटतां येईल (तर बरें होईल). ११. आणि(तशीच)

आपली (जन्माची) सोबतीण व आपले भाऊ; १२. आणि आपलें कुटुंब जें त्याला (प्रसंगापोत) आश्रय देत होतें तें; १३. आणि भूतलावर जे कोणी होत ते सर्व (द्यावें;) व नंतर ह्या(मोबदल्या)नें त्याला वांचवून घ्यावें ! १४. पण (हें तर) कधींहि (होणारच) नाहीं. कारण, नरकाग्नि (असा भयंकर) डोंब होय, १५. कीं तो माथ्याची कातडी उडवून टाकील; १६. (आणि) जे (जगांत सत्यापासून) पाठ फिरवीत व तोंड चुकवीत राहिले, त्यांस तो (आपल्याकडे खेंचून) बोलावील; १७. आणि (आयुष्यभर) ज्यांनीं द्रव्य गोळा केलें व (तें परमार्थांत खर्च न करितां) सांठवून सांठवून ठेवीत राहिले त्यांसहि (बोलावील). १८. निःसंशय, मनुष्य मनाचा फारच दुर्बल निर्माण केला गेला आहे;१९. कीं जेव्हां त्याला (कोणा तऱ्हेचें) नुकसान पोहोंचतें, तेव्हां तो फारच घाबरूं लागतो. २०. आणि जेव्हां त्याला (कोणा तऱ्हेचा) लाभ पोहोंचतो तेव्हां तो लोभ करूं लागतो. २१. परंतु जे नमाज पढतात (त्यांची स्थिति मुळींच अशी नाहीं). २२. (म्हणजे) जे लोक आपल्या नमाजीवर नित्य कायम असतात ते; २३ आणि ज्यांच्या धनदौलतींत, (तोंड पसरून)मागणारा व (लज्जेमुळें) न मागणारा या (दोहों)चा एक नियमित हक्क (मुक्रर) होय ते; २४–२५. आणि जे (शेवटच्या) निर्णयाच्या दिवसाला सत्य जाणतात ते; २६. आणि जे आपल्या पालनकर्त्याच्या शिक्षेस भीत राहतात ते. २७. खचितच त्यांच्या पालनकर्त्याची शिक्षा बिनघोर होण्याची गोष्ट नव्हे. २८. आणि जे लोक आपली लाज संभाळून राहतात; २९. पण आपल्या पत्न्यांपासून व आपल्या उजव्या हाताचे माला–(म्हणजे दासी)पासून मात्र (विषयोपभोग घेतल्यास त्यांत) त्यांना कांहीं दोष लाविला जाणार नाहीं. ३०. पण जो कोणी ह्याखेरीज (आणखी)[1] शोधील तर (समजा कीं,) ते (सृष्टि–) मर्यादेबाहेर निघून गेले आहेत. ३१. आणि जे आपल्या(-ला सोंपविलेल्या) ठेवींचा व आपल्या कराराचा विचार बाळगितात. ३२. व जे आपल्या साक्षीवर शाबिद राहतात; ३३. आणि जे आपल्या नमाजाची कळकळ बाळगितात; ३४. हे लोक (होत कीं,) ज्यांचा (स्वर्गाच्या) बागांत आदर सन्मान केला जाईल. ३५. तर

(१) 'आणखी' या शब्दांत अट लावलेल्या पत्न्यांच्या गणतीशिवाय काम तृप्तीच्या इतर सर्व गैरशिस्त पद्धति दाखल आहेत.

**(हे पैगंबरा ! या) नास्तिकांस काय (होऊन गेलें) आहे कीं, टोळयाच्या-टोळया बनून उजवीकडून व डावीकडून तुजकडे धांवत चालले येत आहेत ? ३६—३७. का यांच्यांतून प्रत्येक मनुष्य (या गोष्टीची) उमेद बाळगितो कीं, तो आनंदाच्या स्वर्गांत दाखल केला जाईल ? ३८. पण (हें तर) कधींच (होणार) नाहीं, आम्हीं त्यांना त्याच(घाणेरड्या) वस्तूंतून निर्माण केलें आहे कीं,जी त्यांना ठाऊक आहे. ३९ तर मला सूर्योदयांच्या व सूर्यास्तांच्या मालकाची(म्हणजे आपली)शपथ आहे कीं आम्हीं या गोष्टीसहि समर्थ आहों; ४०. कीं, (जगांत) यांच्याहून उत्तम (सृष्टि) यांच्याऐवजीं आणून वसवूं;आणि(असें करूं इच्छूं तर) कोणी आमच्या हुकमाबाहेर होऊं शकत नाहीं. ४१. तर (हे पैगंबरा !) यांना निरर्थक बाता झोकूं दे व खेळ करूं दे; येथपर्यंत कीं, (अखेर) ज्या दिवसाचा यांना वायदा केला जात आहे तो दिवस यांच्या नजरानजर येऊन ठेपेल. ४२ (म्हणजे तो दिवस कीं,) जेव्हां हे आपल्या थडग्यांतून निघून पडतील (व गोळा होण्याच्या मैदानाकडे) असे धांवत असतील कीं जणूं कोणा निशाणाकडे धांवत चालले जात आहेत. ४३. (खेद व पश्चात्तापामुळें) यांच्या नजरा खालीं नमलेल्या असतील; हीनत्व यांच्या(चेहऱ्यां)वर पसरलेलें असेल. ज्या दिवसाचा यांना वायदा केला जात होता तो हाच दिवस होय ४४.**

(२) नास्तिकांचे मोठमोठे लोकसमूह हजरत पैगंबर साहेबांपाशीं येत होते; परंतु सद्भावनेनें व श्रद्धेनें नव्हे तर त्यांचा धर्माची हंशी उडविणें हा उद्देश असे. ते तेथें येत तेव्हां गरीब मुसलमानांस धिक्कारानें पाहत व आपसांत म्हणत कीं जर असले क्षुल्लक व नीच स्वर्गांत जातील तर आम्हीं यांजपेक्षांहि अगोदर जाऊन दाखल होऊं. परमेश्वरानें त्यांची ही कल्पना खोडून काढिली कीं तुम्हांस या मुसलमानांवर श्रेष्ठत्व तें कोणतें ? तुम्हांला खुद्द ठाऊक आहे कीं कसल्या घाणेरड्या व क्षुल्लक वस्तूपासून तुमचा जन्म झाला आहे ! जी वस्तु माणसाच्या श्रेष्ठत्वास कारणीभूत आहे व ज्या वस्तूमुळें तो स्वर्गांत जाण्याची उमेद बाळगूं शकतो तो कुलीन जन्म नव्हे तर विश्वासाची कुलीनता होय; ती विश्वासूंना प्राप्त आहे आणि तुम्हीं नास्तिक त्यापासून नामोहरम आहां.

(३) ऋतु बदलतांच सूर्य, चंद्र व नक्षत्रें यांच्या उदय व अस्त होण्याच्या जागाहि बदलत राहतात;म्हणून सूर्योदय व सूर्यास्त हीं बहुवचनीं आलीं आहेत.

(४) निशाण म्हणजे धांवण्याची हद्द बांधलेली जागा कीं, जिच्याकडे मुलें खेळांत धांव मारीत जातात.

# अध्याय ७१ वा.

## सूरतु–नूह.



हा अध्याय **मक्केत** प्रकट झाला. यांत २८ आयात–महावाक्यें आहेत. याचें नांव **नूहचें** प्रकरण असें पडण्याचें कारण हें कीं, यांत हजरत **नूह** पैगबरांच्या प्रेषितत्वाच्या कामगिरीचें वर्णन आलें आहे.



**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराचे नांवानें (मी आरंभ करितों).**



**आम्हीं 'नूह'ला त्याच्या लोकांकडे (पैगंबर करून) पाठविलें कीं तुझ्या लोकांवर दुःखप्रद शिक्षा येऊन पडेल त्याच्या आधींच त्यांना (तिचें) भय घाल. १. (सारांश त्यानें त्यांस) सांगितलें कीं हे माझ्या लोकांनों! मी तुम्हांस राजरोसपणें भय सुचविण्यास आलों आहें; (व तुम्हांस समजावितों,) २. कीं तुम्हीं परमेश्वराची उपासना करा व त्या(च्या कोपा)स भीत राहा; आणि माझा कह्या माना ३. (असें कराल) तर तो तुम्हांस तुमचीं पापें क्षमा करील व (मृत्यूच्या) नियमित काळापर्यंत तुम्हांस (जगांत सुखासमाधानानें राहण्यास) अवसर देईल. जेव्हां परमेश्वराचा (तो ठरीव) काळ येऊन ठेपतो, तेव्हां तो (कोणाच्या टाळल्यानें किंचितहि) पुढें ढकलला जात नाहीं. तुम्हीं जर (इतकी गोष्ट) समजत असतां (तर बरें होतें)! ४. ('नूह' जेव्हां ईश्वरी संदेश पोहोंचविण्याचें कर्तव्य पुरें करून चुकला व लोक त्याला बरोबर पाखंडीच म्हणत राहिले, तेव्हां त्यानें परमेश्वराला) अर्ज केला कीं हे माझ्या पालनकर्त्या! मी आपल्या लोकांस रात्रींहि बोलाविलें व दिवसांहि (बोलाविलें). ५. पण माझ्या बोलाविण्याचा त्यांच्यावर हाच परिणाम झाला कीं, (जितकें जास्त मी बोलाविलें तितकेंच) जास्त ते पळाले. ६. आणि जेव्हां जेव्हां मी त्यांस बोलाविलें कीं (त्यांनीं तुजकडे वळावें व) तूं त्यांचें पाप क्षमा**






करावेंस; तेव्हां तेव्हां त्यांनीं आपल्या कानांत आपलीं बोटें ठोसून ठोसून घेतलीं, (कीं त्यांच्या कानांत कोठें माझ्या बोलावण्याची आवाज पडूं नये); आणि (वरून) आपले कपडे पांघरून पांघरून घेतले (कीं माझें तोंड कोठें त्यांना दिसूं नये;) आणि ते आग्रह धरून राहिले व शेखींत येऊन ऐटून बसले. ७. तदनंतर मी त्यांना मोठ्यानें बोलाविलें; ८. आणि मग मीं त्यांना जाहिरपणेंहि समजाविलें व त्यांना गुप्तपणेंहि समजाविलें. ९. (आणि वारंवार त्यांना) सांगितलें कीं, आपल्या पालनकर्त्यापाशीं (आपल्या पापांची) क्षमा मागा. कारण तो मोठा क्षमाकर्ता होय. (तो तुमचे अपराधहि क्षमा करील.) १०. (आणि) तो तुम्हांवर आभाळांतून मूसळधार वर्षवील; ११. आणि धनदौलत व पुत्राद्वारें तुमची मदत करील, व तुम्हांसाठीं बागबगीचे उगवील व तुम्हां करितां पाण्याचे पाट (वाहते) करील (ते वेगळेच). १२. तुम्हांस काय (होऊन गेलें) आहे कीं तुम्हीं परमेश्वराचा (बिलकुल) आदर बाळगीत नाहीं? १३. आणि वास्तविक पाहतां, त्यानें तुम्हांस तऱ्हेतऱ्हेचे पैदा केलें. (कोणी कसा व कोणी कसा!) १४. कां तुम्हीं पाहिलें नाहीं कीं परमेश्वरानें एकावर एक कशीं सात आकाशें बनविलीं आहेत? १५. आणि त्यांत चंद्रालाहि बनविलें (कीं तो एक) प्रकाश (होय); आणि सूर्याला बनविलें (कीं तो एक प्रकाशित) दिवा (होय). १६. आणि परमेश्वरानेंच तुम्हांला (एका प्रकारें) जमिनींतून[1] उगविलें. १७. तदनंतर (पुन्हां) तो तुम्हांस त्याच मातींत पालटून मिळवील, आणि (पुनरुत्थानांत) तुम्हांस (त्याच मातींतून पुन्हां) काढून उभे करील. १८. आणि परमेश्वरानेंच पृथ्वीला तुम्हांसाठीं बिछाईत बनविली आहे. १९

---

(१) एका प्रकारें जमिनींतून उगविण्याचा अर्थ हा होय कीं मनुष्य जमिनीच्या उगविलेल्या पदार्थांस खातो व त्यांनींच त्याचें पालनपोषण होतें; व त्यांतूनच वीर्य बनतें आणि त्यापासून पुढें माणसांची परंपरा चालते. हेंहि संभवित आहे कीं, यांत 'अबुल्–बशर' ह्मणजे आदिपुरुष हजरत आदम यांच्या पैदा होण्याकडे इषारा असेल; कां कीं, हजरत आदम पैगंबर प्रथमतः मातींतून बनविले गेले होते. तदनंतर, सद्या प्रचारांत असलेली मानववृद्धीची परंपरा चालू झाली.




कीं, तुम्हीं त्याच्या प्रशस्त मार्गांत (जिकडे पाहिजे तिकडे) चालावें (फिरावें). २०. (इतकें समजाविण्यावरहि लोक जेव्हां सरळमार्गावर आले नाहींत तेव्हां.) 'नूह'नें (विनंति करून) म्हटलें कीं, हे माझ्या पालनकर्त्या ! या लोकांनीं माझा कह्या मानिला नाहीं आणि ज्या (अजागळ) लोकांस त्यांच्या द्रव्यानें व त्यांच्या संततीनें (फायद्याच्या जागीं उलटें) आणखी नुकसानच पोहोंचविलें, त्यांच्या म्हणण्याप्रमाणें ते चालले. २१. आणि त्यांनीं माझ्याशीं मोठमोठे डावपेंच केले; २२. आणि (एकमेकांस बहकवून) सांगितलें कीं, तुम्हीं आपल्या उपास्य (देवां)स कधींहि सोडूं नका; आणि 'वद्द' व 'सुवाअ' या (मूर्तीं)स सोडूं नका; आणि (तसेंच) 'यघूस' व 'यऊक' व 'नस्र' या (मूर्तीं)सहि (सोडूं) नका. २३. आणि (हे लोक अशाच गोष्टी समजावून समजावून) बहुतेकांस बहकवून चुकले आहेत. आणि तूं असें कर कीं, या आज्ञाभंजकांचें बहकणें (दिवसेंदिवस) वाढतच चाललें जाईल; (कीं शेवटीं ते शिक्षेस पात्र होतील). २४. (सारांश,) ते आपल्याच पातकांमुळें बुडवून मारिले गेले व मग नरकाग्नींत टाकिले गेले; आणि परमेश्वराशिवाय कोणी मदतगारहि त्यांना मिळाले नाहींत. २५. आणि 'नूह'नें (त्यांना हाहि) शाप दिला कीं, हे माझ्या पालनकर्त्या ! (या) नास्तिकांतून (एकालाहि जिवंत) सोडूं नकोस (कीं, तो) भूपृष्ठावर हिंडतां फिरतां (दिसेल). २६. कारण, तूं जर यांना राहूं देशील तर हे तुझ्या सेवकांस बहकवूनच सोडतील; आणि हे (ज्यांना) जन्म देतील (ते) निव्वळ दुराचरणी व कट्टे नास्तिकच (होतील). २७. हे माझ्या पालनकर्त्या ! मला व माझ्या आईबापांस आणि जो कोणी विश्वासू होऊन माझ्या घरांत (आश्रय घ्यावयास) आला आहे त्यास व (सामान्यतः) विश्वासू पुरुषांस व विश्वासू स्त्रियांस क्षमा कर; आणि असें कर कीं (या) आज्ञाभंजकांचा ऱ्हास (दिवसेंदिवस) वाढतच चालला जाईल. २८.



# अध्याय ७२ वा.

## सूरतुल्--जिन्न.





हा अध्याय मक्केंत प्रकट झाला. यांत २८ महावाक्यें आहेत. यांत जिन्न ह्मणजे दैवताचें वर्णन आलें आहे ह्मणून हें नांव होय.



परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराचे नांवानें (मी आरंभ करितों).

(हे पैगंबरा! सर्व लोकांस) सांगून दे कीं, मला (परमेश्वराकडून असें) प्रकटिलें गेलें आहे कीं, जिन्नातां--दैवतां--तून कांहीं इसमांनीं (मला कुराण वाचतांना) ऐकिलें; आणि (ऐकिल्यावर आपल्या लोकांस जाऊन) सांगितलें कीं, आम्हीं विलक्षण (प्रकारचें) कुराण ऐकिलें; १. कीं तें सन्मार्ग दाखवितें. म्हणून आम्हीं त्याचा विश्वास धरिला. आणि आम्हीं तर कोणालाहि आपल्या पालनकर्त्यांचा कधींहि सरकतदार ठरविणार नाहींच. २. आणि आमच्या पालनकर्त्यांची थोरवी अत्युच्च होय; त्यानें तर कोणालाहि आपली (जन्माची) सोबतीण बनविली नाहीं आणि कोणाला मुलगा मुलगीहि (बनविली) नाहीं. ३. आणि आमच्यांतले (कांहीं) मूर्ख (असेहि होऊन गेले आहेत कीं जे) परमेश्वरासंबंधानें फारच फाजिल[१] बोल बोलत होते. ४. आणि आम्हीं तर असें समजत होतों कीं मनुष्य (काय) व जिन्न--दैवत (काय कोणीहि) परमेश्वराविरुद्ध खोटें बोलूं शकत नाहीं. (एवंच, ह्याच विचारानें आम्हींहि त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें चालत राहिलों.) ५. आणि मानवांतून कांहीं लोक जिन्नातां-दैवतां-पैकीं कित्येक लोकांचा आश्रय धरीत होते. म्हणून या मानवांनीं जिन्नातांस आणखीहि जास्तच (गर्विष्ठ करून) फसगतींत टाकिलें. ६.

(१) फारच फाजिल बोल बोलणें म्हणजे बुद्धीस न पटणाऱ्या व धर्मशास्त्राविरुद्ध अशा गोष्टी, परमेश्वराची व्यक्ति व विशेषणांविषयीं बोलून दाखविणें.










आणि जसा तुम्हीं (जिन्नतांनीं) तर्क केला होता तसा मानवांनींहि तर्क केला होता कीं (गतकाळीं परमेश्वरानें कोणालाहि पैगंबर करून पाठविलें नाहीं. व यापुढेंहि) परमेश्वर केव्हांहि कोणाला (पैगंबर करून) पाठविणार नाहीं. ७. आणि आम्हीं आकाशालाहि ढुंढाळून पाहिलें तों, मोठ्या मजबूत चौक्यांनीं व उल्क्यां(च्या ज्वालां)नीं भरलेलें असें त्याला पावलों. ८. आणि पूर्वीं तर आकाशांत पुष्कळशीं स्थलें होतीं कीं जेथें आम्हीं ऐकण्यासाठीं (जाऊन) बसत असूं. (परंतु) आतां जो कोणी ऐकूं पाहील, तर एक उल्का(–गोलक) तो आपल्या पाळतींत लागलेला (तयार) पावेल. ९. आणि आम्हीं जाणीत नाहीं कीं, (या व्यवस्थेनें) जे कोणी पृथ्वींत (राहत) आहेत त्यांस नुकसान पोहोंचविणें मंजूर आहे ! अगर त्यांच्या पालनकर्त्याचा हेतु त्यांचें कल्याण करण्याचा आहे ! १०. आणि आमच्यांतून कित्येक तर सदाचरणी होत आणि आम्हांपैकीं कांहीं ह्याशिवाय आणखी (दुसऱ्या प्रकारचे) होत. (सारांश,) आम्हींहि निरनिराळे पंथ (होत आलों) आहों. ११. आणि (आतां) आम्हीं समजून घेतलें कीं, आम्हीं पृथ्वींत (राहून) परमेश्वरास हारवूं शकणार नाहीं आणि (कोणीकडे) पळूनहि त्याला हारवूं शकणार नाहीं. १२. आणि आम्हीं जेव्हां सन्मार्गाची गोष्ट ऐकिली तेव्हां आम्हीं तिचा विश्वास धरिला. तर जो कोणी आपल्या पालनकर्त्याचा विश्वास धरील, त्यानें कोणाहि नुकसानास व (कोणा) अन्यायासहि भिऊं नये. १३. आणि आम्हांपैकीं कित्येक तर मुसलमान–आज्ञाधारक–(सेवक) होत व आमच्यांतून कित्येक (आज्ञेहून) चळणारे होत. तर ज्यांनीं (इस्लाम ह्मणजे) आज्ञाधारण पत्करलें, त्यांनीं सरळमार्ग शोधून काढिला. १४. आणि ज्यांनीं शिरजोरी केली ते (वाकड्या मार्गीं चालले व अखेर) नरका-

(१) येथें आलेल्या 'यब्‌अस्' या शब्दाचे दोन अर्थ होत. एक पैगंबर करून पाठविणें व दुसरा मेलेल्यांस जिवंत करून उठविणें; पैगंबरीच्या नाकारणीकडे इषारत असेल तर आम्हीं जो अर्थ पत्करला आहे तो ग्राह्य आहे; आणि जर पुनरुत्थानास नाकारणें असा अर्थ घ्याल तर तो असा होईल, '(परमेश्वरानें अद्यापपर्यंतहि) कोणा(मेलेल्या)स (जिवंत करून उठविलें नाहीं आणि यापुढेंहि) तो (जिवंत करून) उठविणार नाहीं.'




ग्नीचें इंधन बनून गेले. १५. आणि (हे पैगंबरा ! लोकांस सांग कीं, परमेश्वर म्हणतो कीं, 'मक्के'चे लोक धर्माच्या) सरळ मार्गावर कायम राहते, तर आम्हीं त्यांना रेलचेल पाणी पाजतों. १६. अशासाठीं कीं आम्हीं या (सुबत्तेच्या देणगीं)त त्यां(च्या उपकार स्तुती) ची परिक्षा[1] पाहावी. आणि जो कोणी आपल्या पालनकर्त्याच्या स्मरणापासून तोंड फिरवील, तर तो त्याला सक्त शिक्षेंत नेऊन दाखल करील. १७. आणि मशीदी तर परमेश्वराच्याच (उपासने) साठीं होत. तर (लोकांनों! त्यांत) परमेश्वरा बरोबर (आणखी) कोणाचा धांवा करूं नका. १८. आणि जेव्हां परमेश्वराचा सेवक (म्हणजे 'मोहंमद') परमेश्वराची उपासना करण्यास उभा राहतो तेव्हां (लोक गर्दी करून येतात व) जवळ जवळ त्याला चिटकून[2] जातात. १९. (हे पैगंबरा! या लोकांस) सांग कीं मी तर केवळ आपल्या पालनकर्त्याची उपासना करितों आणि कोणालाहि त्याचा सरकतदार ठरवींत नाहीं. २०. (हे पैगंबरा! या लोकांस) सांग कीं तुमचें नुकसान किंवा कल्याण (कांहींहि) माझ्या अधिकारांत नाहीं. २१. (हे पैगंबरा! या लोकांस) सांग कीं परमेश्वरा (-चे कोपा) पासून कोणीहि मला आश्रय देऊं शकत नाहीं; आणि त्याच्याशिवाय मला कोठें आसराहि मिळूं शकत नाहीं. २२. माझा बचाव तर यांतच आहे कीं परमेश्वराकडून (जो हुकूम आला आहे तो लोकांस) पोहोंचवून द्यावा आणि त्याचे

(१) हजरत पैगंबर साहेबांनीं नव्या नव्यानें लोकांस इस्लामधर्माकडे आमंत्रण करण्याची सुरुवात केली होती; कीं इतक्यांत मक्केकरांनीं मोठ्या सक्तीनें विरोध केला; आणि लागोपाठ सात वर्षें अरबी द्वीपकल्पांत दुष्काळ राहिला. या महावाक्यांत या दुष्काळाच्या शिक्षेकडे इशारा आहे. ह्मणजे जर हे लोक सद्धर्मास विरोध न करते तर दुष्काळ न पडता आणि पुष्कळ सुबत्ता होते.

(२) भावार्थ हा दिसतो कीं, हजरत पैगंबर साहेब नवीन तऱ्हेची भक्ति करीत ह्मणजे नमाज पढीत होते व लोकांस तिचा परिचय नव्हता; ह्मणून ते विलक्षण चीज समजून तमाशा पाहण्यासाठीं येऊन घेरून टाकीत होते. परमेश्वरानें हजरत पैगंबरसाहेबांस आज्ञा केली कीं या लोकांस तुम्हीं आपल्या भक्तिचा मूळ हेतु व पैगंबरीची हकीकत समजावा.

निरोप (सर्वांस ऐकवावेत). आणि जो कोणी परमेश्वर व त्याचा पैगंबर यांची आज्ञा मोडील, तर कांहीं संशय नाहीं कीं (शेवटीं) त्याच्यासाठीं नरकाग्नि होय; त्यांत ते नित्य निरंतर राहतील. २३. (परंतु नास्तिक तर) त्यांना ज्या(शिक्षे)चा वायदा केला जातो ती (शिक्षा) पाहून घेईपर्यंत (या गोष्टीस मानणार नाहींत). मग त्या वेळीं यांना माहीत होऊन जाईल कीं, कोणाचे मदतगार नेभळे होत आणि (कोण) संख्येंत अत्यल्प होत ? २४. (हे पैगंबरा ! या लोकांस) सांग कीं, ज्या(शिक्षे)चा तुम्हांस वायदा केला जातो, मी जाणीत नाहीं कीं, ती जवळ आहे ! किंवा माझा पालनकर्ता अमुक एका काळापर्यंत तिला दिरंगाईवर टाकील ! २५. (तोच) अदृष्टाचा ज्ञाता होय. तर तो आपल्या गैबी—अदृष्ट गोष्टी कोणालाहि जाहीर करीत नसतो; २६. पण ज्या पैगंबरास तो प्रसन्नतापूर्वक निवडून घेईल त्यालाच मात्र (कोणाप्रयोजनामुळें तो एखादी गोष्ट जाहीर करूं इच्छितो); तेंहि (अशा खबरदारीनें कीं,) त्याच्यापुढून व त्याच्यामागून (देवदुतांचा) पहारा (त्याच्यासंगतीं) ठेवितो; २७. अशासाठीं कीं, त्यानें जाणून[1] घ्यावें कीं, पैगंबरांनीं आपल्या पालनकर्त्याचे निरोप (लोकांस बरोबर) पोहोंचवून दिले; आणि त्यांची सारीं कामें त्याच्या (ज्ञानाच्या) आटोक्यांत होत आणि त्यानें प्रत्येक वस्तूची गणती (देखील आपल्या नजरेंत) करून ठेविली आहे. २८.

(१) येथें कोणी हा अपवाद काढील कीं, जर परमेश्वर सर्व ज्ञानी आहे तर त्याला ही गोष्ट जाणून घेण्याची जरूर काय ? यास उत्तर हें कीं, त्याला प्रत्येक गोष्टीचें ज्ञान आहे; पण येथें केवळ ज्ञान हेंच उद्दिष्ठ नव्हे. तर या जगामध्यें एकाद्याचा अपराध बरोबर माहीत असला तरी कायद्याप्रमाणें पुरावा करण्यास व गुन्हा पदरीं घालण्यास जसें ज्ञान पाहिजे असतें तसेंच परमेश्वरासाठींहि पुराव्यासह ही गोष्ट जाणून घेणें हें न्याय्य आहे.



# अध्याय ७३ वा.

## सूरतुल्-मुज्जंम्मिल्.



हा अध्याय मक्का शहरीं प्रकट झाला. यांत २० महावाक्यें आहेत. हजरत मोहंमद पैगंबरसाहेबांस जेव्हां जेव्हां दिव्य प्रकटीकरण होई तेव्हां तेव्हां त्यांना आध्यात्मिक स्थिति प्राप्त होत असे. या स्थितीचा प्रत्येकास आत्मानुभव असणें शक्य नाहीं; म्हणूनच कित्येक मतिशून्य व जडवादी ख्रिस्ती पाद्री वगैरे यांनीं या आध्यात्मिक स्थितीचें नांव रोग किंवा फेंफरें असें ठेविलें आहे; हें त्यांचें बुद्धिमांद्य होय. या स्थितीचा तपशील सांगतां येत नाहीं. परंतु कडकडीत हिंवाळ्यांत पैगंबर साहेब त्या वेळीं घामाघूम होऊन जात होते; त्यांचा रंग फिका होऊन जाई आणि शरीर भारी पडून जाई; येथपर्यंत कीं ते कधीं कधीं सांढणीवर आरूढ असत तेव्हां दिव्य प्रकटीकरणाच्या समयीं ती सांढणी ओझ्यामुळें खालीं बसून जाई. आणि सुरवातींत तर हजरत पैगंबरसाहेबांस फार दहशत वाटत असे. सारांश, हा व या पुढील अध्याय हे दोन्हीं प्राथमिक होत. ह्मणून हजरत पैगंबर साहेब भय व हैबतीमुळें कांबळींत मुसकटून पडले होते. तथापि हे कांबळींत मुसकटून पडलेल्या ! असें परमेश्वरानें त्यांस संबोधिलें आहे ह्मणून हें नांव पडलें

**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराचे नांवानें (मी आरंभ करितों).**

हे (पैगंबरा!) जो (प्रकटीकरणाच्या दहशतीनें) कांबळींत मुसकटून पडलेला आहेस त्या तूं ! १. रात्री(च्या समयीं नमाजीं)त उभा राहात जा; (तेंहि सारी रात्र नव्हे) तर साऱ्या रात्रीपेक्षां कमीच; २. (ह्मणजे) अर्धीरात्र, अथवा तींतूनहि थोडीशी कमी करीत जा.३ किंवा अर्ध्यांवरहि कांहीं वाढवीत जा. आणि कुराणाचें खूप धीरेधीरे पठण करीत जा. ४. आम्हीं लवकरच तुझ्यावर एका मोठ्या भारी हुकमा(म्हणजे पैगंबरी)चा बोजा टाकणार आहों. (तर तूं आपल्याला मेहनतीची संवय लावून

घे). ५. निःसंशय रात्रीचें उठणें (मनोविकारास) खूप जेर करितें आणि (त्यावेळीं) प्रार्थनाहि नीट (मनापासून) निघते. ६. (आणि) दिवसाच्या वेळीं तर तुला (प्रवचनांत) फार लांबलचक उद्योग राहत जाईल. ७. आणि आपल्या पालनकर्त्याचें नांव घेत जा व (सर्वांकडून) तुटून त्याचाच होऊन राहा. ८. (तो) पूर्व आणि पश्चिम(म्हणजे सर्व जगां)चा स्वामी आहे; (व) त्याच्यावांचून अन्य कोणी उपास्य नाहीं; म्हणून त्यालाच (आपला) कर्ताहर्ता समज. ९. आणि (नास्तिक) जसजशा गोष्टी (तुझ्यासंबंधानें) बोलतात त्या (मुकाट्यानें) सहन कर आणि चांगल्या सभ्यपणानें त्यां(च्या सहवासा)स सोडून दे. १०. आणि (हे) जे पाखंडी म्हणणारे सुखवस्तु लोक होत त्यांजला व मजला (तूं आपापल्या स्थितीवर) राहूं दे;(मी त्यांस पाहून घेईन); आणि तूं त्यांना थोडासा अवकाश दे.११. निःसंशय, आम्हांपाशीं (यांच्या जखडण्यास) बिड्या व (यांना आंत झोंकून देण्यास) नरकाग्नि, १२. आणि (यांना खावयास असें) अन्न कीं जें गळ्यांतून उतरणार नाहीं व (अनेक प्रकारच्या) दुःखप्रद शिक्षा ह्या (तयार) होत. १३. ज्या दिवशीं जमीन व पर्वत हे हालूं लागतील आणि पर्वत (एकमेकांशीं अदळाअदळ होऊन वाळुच्या) भुरभुरीत टेंकड्या होऊन जातील; (त्यादिवशीं ही शिक्षा घडून येईल.) १४. (लोकांनों !) ज्याप्रमाणें आम्हीं 'फिरऔना'कडे ('मूसा'ला) पैगंबर (करून) पाठविला होता त्याचप्रमाणें आम्हीं तुम्हांकडेहि ('मोहंमद'ला) पैगंबर (करून) पाठविला आहे; कीं तो (पुनरुत्थानाचे दिवशीं) तुमच्यावर साक्ष देईल. १५. पण 'फिरऔना'नें (त्या) पैगंबरांचा आज्ञाभंग केला;

(१) 'वतअ' या शब्दाचा प्रधान अर्थ तुडविणें, पादाक्रांत करणें किंवा जेर करणें असा आहे. शिवाय कुराण समजण्यांत कानांचें मनाशीं तादात्म्य होणें व नीट उच्चार निघणें असाहि अर्थ जलालैन या भाष्यकारद्वयांनीं केला आहे; तथापि जॉर्ज सेल या कुराणाच्या इंग्रजी भाषांतरकारानें मरासी या फ्रेंच भाषांतरकर्त्यानें दिलेल्या भाषांतराचा उतारा घेतला आहे त्यांत या शब्दाचा अर्थ विषयसुखोपभोग असा जो केला आहे त्या योगें त्यानें अरबी वाङ्मया-संबंधानें आपलें अज्ञान मात्र व्यक्त केलें आहे. कारण या श्लेषोक्तीचा निषेध त्या पुढल्याच वाक्याच्या अर्थानें स्पष्टपणें होतो.

(२) साक्ष देईल ह्मणजे मुसलमान व नास्तिक यांची स्थिति उघड करून सांगील कीं, मुसलमानांनीं मानिलें व नास्तिकांनीं मानिलें नाहीं.

म्हणून आम्हीं त्याला सक्त शिक्षेंत पकडलें. १६. मग जर तुम्हींहि न मानाल तर त्या दिवसाच्या ( आपत्ती) पासून तुम्हीं कसे बचावूं शकाल ? कीं, जो (दिवस सक्तीमुळें) मुलांस (अवेळींच) वृद्ध करून टाकील. १७. (आणि) त्या दिवशीं आकाश फाटून जाईल; (हा) परमेश्वराचा वायदा (होय; कीं तो) पूर्ण होऊन राहील. १८. ह्या उपदेशाच्या गोष्टी होत; तर जो कोणी इच्छील तो आपल्या पालनकर्त्यापर्यंत(पोहोंचण्या)चा मार्ग पत्करील. १९. (हे पैगंबरा !) तुझा पालनकर्ता जाणतो कीं, तूं व कांहीं लोक जे तुझ्या संगतीं होत ते, (तुम्हीं कधीं) दोन तृतीयांश रात्रीच्या जवळजवळ व (कधीं) अर्धी रात्र व (कधीं) एक तृतीयांश रात्र (नमाजांत) उभे राहतां. आणि रात्र व दिवसाचा (नीट) अंदाजा परमेश्वरच करूं शकतो. त्याला माहीत आहे कीं तुम्हीं वेळेची गणना[1] करूं शकत नाहींत; ह्मणून त्यानें तुम्हांवर दया केली (व वेळेचा निर्बंध काढून टाकिला.) तर (आतां 'तहज्जुद'–रात्रीच्या नमाजी–मध्यें) तुम्हीं जितकें कुराण सहजीं वाचतां येईल तितकें वाचीत जा. त्याला माहीत आहे कीं तुमच्यांतून कित्येक (माणसें) अजारी पडतील व दुसरीं (कित्येक) परमेश्वराची कृपा (म्हणजे चरितार्थ) याचे शोधांत (इकडे तिकडे) मुलखांत प्रवास करीत असतील; आणि इतर (कित्येक) परमेश्वराचे मार्गांत (शत्रूंशीं) लढत असतील. म्हणून (कांहीं झालें तरी) तुम्हीं जितकें कुराण ('तहज्जुद'मध्यें) सहजीं वाचतां येईल तितकें वाचीत जा. आणि (पांच वेळेची) नमाज[2] पढीत रहा व जकात देत राहा, आणि (जकाती-

---

(१) वेळेची गणना करणें ह्मणजे वक्तशीरपणा पाळणें; ह्मणजे तुम्हांला हें नीट रीतीनें जाणतां येणार नाहीं कीं, किती रात्र लोटली व किती राहिली. ज्यावेळीं घड्याळें निघालीं नव्हतीं व रात्रीच्या समयीं मुख्यत्वेंकरून वादळाच्या व आभाळाच्या दिवसांत अटकळ बांधणें मुष्किलीचें होतें; त्यावेळचें हें वर्णन आहे. शिवाय प्रस्तुत काळीं घड्याळें असूनहि रात्र मोजीत बसणें हेंहि कष्टाचें काम आहे. ह्मणून वेळेची गणना करणें व किती रात्र झाली हें पाहत बसणें आम्हां मनुष्यांस दुष्कर होईल हें परमेश्वरास माहीत होतें.

(२) इस्लामाच्या आरंभीं रात्रीं उठून नमाज पढण्याचा हुकूम झाला होता. सारांश एक वर्षभर या हुकमाची अमलबजावणी होत राहिली. परंतु

खेरीज) परमेश्वराला दिलखुशीनें कर्जेहि देत जा. आणि जें पुण्यंहि तुम्हीं आपल्यासाठीं पहिल्यानेंच (पुढच्या सामुग्रीदाखल) पाठवून द्याल तें तुम्हीं परमेश्वराजवळ (जाऊन) पावाल, कीं तें (तुमच्याठायीं इहलौकिक फायद्यापेक्षां) फार उत्तम होय; व (त्याचें) प्रतिफलहि मोठें होय. आणि परमेश्वरापाशीं (आपल्या अपराधांची) क्षमा मागीत राहा. निःसंशय परमेश्वर मोठा क्षमाकर्ता (व) दयाळू होय. २०

रात्रीच्या नमाजीमुळें लोकांस तकलीफ होत होती. म्हणून परमेश्वरानें रात्रीची नमाज 'नफिल' ह्मणजे अधिक फलदायी ठरविली आणि पांच वेळची नमाज फर्ज़ म्हणजे कर्तव्य ठरविली, या अध्यायांत नफिल व फर्ज़ या दोन्हीं नमाजींचें वर्णन आहे.

(१) कर्ज ह्मणजे दुसरे दानधर्म असा भावार्थ होय; अथवा जकात ह्मणजे धर्मकर देण्याचे उत्तेजनासाठीं कर्ज असें कदाचित ह्मटलें असावें; तर ह्या स्थितींत कर्ज देणें म्हणजे परमेश्वराचें देणें देऊन टाकणें असा अर्थ होईल.

(२) 'खैर' या शब्दाचा अर्थ आम्हीं 'पुण्य' केला आहे. कित्येक विद्वान 'खैर' ह्मणजे द्रव्य असाहि अर्थ घेतात; शिवाय कुराणांत कित्येक जागीं खैर म्हणजे द्रव्य हा अर्थ होतो. तर या स्थितींत वाक्याचा हा अर्थ होईल:— 'कीं, जें द्रव्य (परमेश्वराचे मार्गांत खर्च करून पुढच्या सामुग्रीदाखल) तें पहिल्यानें पाठवून द्याल' वगैरे वगैरे.

# अध्याय ७४ वा.

## सूरतुल्–मुद्दस्सिर.



हा अध्याय मक्का शहरीं प्रकट झाला. यांत ५६ महावाक्यें वा आयात आहेत. हजरत जाबिर नांवाच्या 'सहाबी' ह्मणजे पैगंबरसाहेबांचे तत्कालीन अनुयायी यांनीं असें कथन केलें आहे कीं हजरत मोहंमद पैगंबर—परमेश्वर त्यांस धन्यवाद व शांति देवो—यांनीं सांगितलें कीं मी एकदां वाटेनें चालला जात होतों तों, एकाएकीं एक आकाशवाणी ऐकिली व वर पाहिलें; तेव्हां पाहतों काय कीं पृथ्वी व

आकाश यांच्या दरम्यान एक देवदूत सिंहासनारूढ आहे. त्याला पाहून मी इतका भ्यालों कीं कांपत कांपत घरीं जाऊन निजून राहिलों व सांगितलें कीं, माझ्या अंगावर पासोडी घाला. घरच्या लोकांनीं वरून पासोडी घातली. या स्थितींतच या अध्यायाचीं पहिल्यापासून कित्येक महावाक्यें मला प्रकट झालीं. 'हे पासोडींत मुसकटून पडलेल्या'! असें ह्यांत परमेश्वरानें त्यांस संबोधिलें आहे म्हणून हें नांव झालें. यांत लोकांस इस्लामधर्माकडे आमंत्रण करणें, नमाज पढणें, 'तकबीर' ह्मणजे परमेश्वराचा गौरव करणें, वस्त्रें स्वच्छ राखणें, मूर्तींचा त्याग करणें, कोणाला कांहीं दिलें तर त्याचा बदला न मागणें आणि परमेश्वराच्या देणगीवर संतुष्ट राहणें वगैरे मुख्य मुख्य गोष्टींचा उपदेश आहे.

**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराच्या नांवानें ( मी आरंभ करितों).**

**हे (पैगंबरा!) जो (प्रकटीकरणाच्या हैबतीनें) पासोडींत मुसकटून पडलेला आहेस त्या तूं ! १. उठ आणि (लोकांस ईश्वरीशिक्षेचें) भय घाल. २. आणि आपल्या पालनकर्त्याचा गौरव कर. ३. आणि आपलीं वस्त्रें खूप पाक साफ ठेव. ४. आणि गलिच्छपणा[1](म्हणजे मूर्ती)चा त्याग कर. ५. आणि (संदेश पोहोंचविण्यास) मोठें (भारी) काम[2] समजून (लोकांवर) उपकार ठेवूं नकोस. ६. आणि (संदेश पोहोंचविण्यांत जीं विघ्नें येतील तीं) आपल्या पालनकर्त्या(ची मर्जी संपादण्या)साठीं (मुकाट्यानें) सहन कर. ७. मग जेव्हां करणा फुंकला जाईल तेव्हां, ८. तो दिवस फार**

(१) येथें दिसण्यास स्वच्छपणा राखण्याची ताकीद आहे. पण कित्येक भाष्यकार ह्मणतात कीं, गलिच्छपणा किंवा घाण ह्मणजे अनेकेश्वरवाद, मूर्तीपूजा व निंद्य वर्तन हीं होत. त्यांनीं वस्त्रांचा अर्थ आपलें मन व आपलें स्वत्व असाहि घेतला आहे.

(२) पैगंबरीचे संदेश पोहोंचविणें हें मोठें काम आहे यांत संशय नाहीं. परंतु परमेश्वर या जागीं पैगंबरसाहेबांस नीतिचें शिक्षण देत आहे; कीं संदेश पोंचते करणें हें तुमचें कर्तव्य आहे; तुम्हीं त्यास मोठें भारी काम समजून लोकांवर त्याचे उपकार ठेवूं नका. अथवा हेंहि भाषांतर होईल कीं:-(कोणादर या हेतूनें) उपकार करूं नकोस कीं, (उपकाराहून) जास्त (बदला) इच्छावा.

कठीण दिवस होईल; ९. कीं तो नास्तिकांसाठीं (मुळींच) सुखाचा होणार नाहीं. १०. (हे पैगंबरा !)मला व मी ज्याला एकटाच (म्हणजे केवळ साधनरहित) पैदा केलें त्या(नालायका)स (आपापल्या स्थिती- वर) राहूं दे; (मी त्याला पाहून घेईन). ११. आणि मी त्याला विपुल द्रव्य दिलें. १२. आणि (द्रव्याखेरीज) मुलगे (कीं जे लढण्या- मरण्यास त्याच्या संगतीं) हजर होत. १३. आणि हर तऱ्हेचीं (संसार–) साधनें मी त्याच्यासाठीं तयार केलीं. १४. यावरहि तो (ही अनाठायीं) आशा बाळगून बसला आहे कीं मी (परलोकीं त्याला कांहीं) आणखीहि देईन. १५. पण हें तर मुळींच होणें नाहीं. (कारण,) तो आमच्या निशाण्यांचा विरोधी होता. १६. लवकरच मी त्याला सक्त[1] शिक्षेंत पीडीन. १७. (कारण, जेव्हां त्याला कुराणासंबंधीं विचारिलें गेलें तेव्हां) त्यानें (मनांत) विचार केला व अदमास बांधिला. १८. तर त्याला (परमेश्वराचा) मार असो! (पाहा तर!) त्यानें कसा अदमास बांधिला!१९.तद्नंतर(पुन्हां)त्याला(परमेश्वराचा)मार असो! (पाहा तर!) त्यानें कसा अदमास बांधिला! २०.मग त्यानें(पुन्हां)विचार केला;व मग कपाळास अठया घातल्या व तोंड वाईट केलें; २२. नंतर पाठ- फिरवून चालता झाला व अभिमानांत[2] येऊन गेला; २३. व म्हणूं लागला कीं हें (कुराण) तर केवळ (एका प्रकारची) जादू होय कीं जी (प्राचीन लोकांपासून) चालत येत आहे; २४. हें (कुराण) तर केवळ (कोणा) माणसाचें म्हटलेलें होय. २५. तर लवकरच मी त्याला (नेऊन) नरकाग्नींत झोंकून देईन. २६. आणि (हे पैगंबरा!) तूं काय समजलास

---

(१) हदीसमध्यें आलें आहे कीं, नरकाग्निच्या इतर शिक्षांपैकीं एक शिक्षा ही होईल कीं नरकवाश्यांस 'सऊद' नांवाच्या एका पर्वतावर चढावें लागेल. सत्तर वर्षेंपर्यंत मोठ्या कष्टानें पर्वताचे शिखरावर चढतील व मग पुन्हां तेथून निस- रून खालीं येतील. मग पुन्हां चढतील व पुन्हां खालीं येतील. कित्येक भाष्य- कारांनीं या महावाक्याचा हाच अर्थ केला आहे कीं त्यांना 'सऊद' पर्वतावर चढण्यास भाग पाडिलें जाईल.

(२) हीं महावाक्यें वलीद बिन मुगीरा नांवाच्या एका नास्तिकासंबंधानें कीं, जो कुराणासंबंधानें उद्धटपणानें बोलत होता, प्रकट झालीं आहेत.






कीं नरकाग्नि आहे तरी काय? २७. तो (फडशा केल्याशिवाय कांहींच) राखून ठेवणार नाहीं व (भस्म केल्याखेरीज) सोडणार नाहीं. २८. (आणि तो मनुष्याच्या) शरीरत्वचेस (मारून) होरपळून टाकील. २९. त्यावर एकोणीस (पाहरेकरी तैनातीस) होत. ३०. आणि आम्हीं नरकाग्नीचे पाहरेकरी (मनुष्यें नव्हे तर) देवदूतच बनविले आहेत. आणि त्यांची (एकोणिस)ही गणतीहि यासाठीं ठरविली आहे, कीं जे लोक (पुनरुत्थानास) नाकारितात त्यांची (या गोष्टींच्याद्वारें) परिक्षा व्हावी; (आणि) हें कीं ज्यांना पुस्तक दिलें गेलें आहे त्यांनीं (ऐकतांच पक्का) विश्वास धरावा. आणि जे मुसलमान होत त्यांचा विश्वास (या गोष्टींनीं) आणखी जास्तच व्हावा; आणि ज्यांना पुस्तक दिलें गेलें आहे ते व मुसलमान यांनीं (या गोष्टींत कोणा तऱ्हेची) शंका करूं नये; आणि ज्या लोकांच्या मनांत (दांभिकपणाचा) रोग आहे व जे (उघड-उघड) नास्तिक आहेत त्यांनीं (ऐकून) म्हणावें कीं असल्या गोष्टींचा दृष्टांत सांगण्यांत परमेश्वराचा काय उद्देश आहे? (हे पैगंबरा!) असेंच (तर) परमेश्वर ज्याला इच्छितो त्याला आड मार्गीं भटकवितो आणि ज्याला इच्छितो त्याला सरळ मार्ग दाखवितो; आणि तुझ्या पालनकर्त्याच्या (सृष्टीच्या) लष्करांची स्थिति त्याच्याशिवाय कोणीच जाणीत नाहीं. आणि या गोष्टी मनुष्यास बोध[२] मात्र होत, (झालें). ३१.

(१) नास्तिकांस, एकोणीस देवदुतांचें ठरविणें ऐकून आश्चर्य झालें; कीं एकोणीसच कां? पण वास्तविक पाहतां ह्या गोष्टी ईश्वरीगूढांपैकीं होत. यांत जास्त माथेफोड करणें व्यर्थ. कांहीं प्रयोजन असेल कीं त्याचें सेवकांस जाहीर करणें योग्य समजलें गेलें नसेल. पण ग्रंथधारी लोक म्हणजे यहुदी व ख्रिस्ती असल्या गोष्टी मान्य करण्यास कचरत नाहींत. कारण त्यांच्या पुस्तकांत अशा पुष्कळ गोष्टी आहेत कीं, ज्या ईश्वरी आदेश समजल्या जातात; व ते त्यांचा विश्वास ठेवितात. म्हणून मुसलमान ज्यांना आपल्या पैगंबराच्या बोलण्याचा विश्वास आहे ते कांकूं करतील तर ते दांभिक व नास्तिक होतील. ते सर्वच गुप्त गोष्टी जाणूं पाहतात ही त्यांची चूक होय.

(२) बोध ह्मणजे लोक नरकाग्नीचा अहवाल ऐकून बोध धरतील व देवदुतांच्या गणतींत शंका उपस्थित करून वितंडवाद करणार नाहींत.




# अध्याय ११० वा.

## सूरतु–न्नस्र्.



हा अध्याय मदिनेंत प्रकट झाला. यांत ३ आयात–महावाक्यें आहेत. याचें नांव 'सूरतु–न्नस्र' म्हणजे कुमक किंवा विजयाचें प्रकरण होण्याचें कारण हें कीं ८ व्या हिजरी-सनाच्या रमजान महिन्यांत मक्केवर हजरत पैगंबरांस विजय मिळाला. त्याच्यापूर्वींच हा अध्याय प्रकट झाला होता; व ह्यांत या कुमकेचें व जयाचें आश्वासन मिळालें होतें.

**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराच्या नांवानें (मी आरंभ करितों.)**

**(हे पैगंबरा !) ज्या अर्थीं परमेश्वराची कुमक येऊन पोहोंचली व ('मक्के'वर) विजय (प्राप्त झाला); १. आणि तूं लोकांस (प्रत्यक्ष) पाहिलेंस कीं, परमेश्वराच्या धर्मांत (म्हणजे इस्लामांत) घोळकेचे घोळके दाखल होत आहेत, २. त्या अर्थीं तूं आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबर (त्याची) पवित्रता वर्णण्यांत लागून अस; आणि त्याच्यापाशीं क्षमा मागीत राहा. निःसंशय, तो फारच पश्चात्ताप स्वीकारता होय. ३.**

(१) कुराणाचें हेंहि एक भविष्य वचन होतें व तें हिजरी-सन ९ मध्यें जेव्हां अरब लोकांचीं घराणीं चोहोंकडून येऊन येऊन त्यांनीं इस्लामधर्माची दीक्षा घेतली व हें हजरत पैगंबरांनीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें तेव्हां पूर्ण झालें. हें या गोष्टीचें चिन्ह होय कीं हजरत पैगंबरांनीं आपलें पैगंबरीचें कर्तव्य पूर्ण केलें व आतां त्यांनीं परलोकवासासाठीं तयार व्हावें. पुढें हि. स. १० च्या रबिउल्-अव्वल महिन्यांत हजरत मोहंमद पैगंबर 'सल्लल्लाहो व अलैहे व सल्लम'–परमेश्वर त्यांस धन्यवाद व शांति देवो–यांचा देहांत झाला. म्हणूनच याचें दुसरें नांव 'सूरतु–त्तौदीअ' म्हणजे निरोपाचें प्रकरण असेंहि आहे.

(२) परमेश्वराचे सर्व पैगंबर आपल्या नियत शास्त्राप्रमाणें आचरण करतात; व त्यांच्या हातून नियमोल्लंघन म्हणजे पाप घडत नाहीं; म्हणून ते निष्पाप असतात. त्यांना आपल्यासाठीं क्षमा मागण्याची अपेक्षा राहत नाहीं. पण लोकसंग्रहार्थ व त्यांच्या शिक्षणार्थ पैगंबरांना क्षमा मागण्याची आज्ञा होते. शिवाय ह्यांत एक मुख्य हें शिक्षण आहे कीं, माणसानें आपलीं सर्व कर्में दोषविरहित न समजतां त्याबद्दल आपला विनय प्रदर्शित करावा व तीं कामें अधिकाधिक उत्तम प्रकारें करण्याचें त्यांस प्रोत्साहन मिळावें. ह्या आज्ञेस अनुसरून अशाच उद्देशानें हजरत पैगंबरसाहेब दिवसांत शंभर वेळां क्षमायाचना करीत होते.

# अध्याय १११ वा.

## सूरतु--ल्लहब्.



हा अध्याय मक्केंत प्रकट झाला. यांत ५ आयात—महावाक्यें आहेत. याचें नांव 'सूरतु—ल्लहब' म्हणजे लहबचें प्रकरण, असें पडण्याचें कारण हें कीं 'हे पैगंबरा ! तूं आपल्या अगदीं जवळच्या आप्तांस (ईश्वरी शिक्षेचें) भय ऐकीव,' हें महावाक्य जेव्हां प्रकट झालें तेव्हां हजरत पैगंबर साहेबांनीं सर्व कुरैशी घराण्यांस बोलावणें करून त्यांस उपदेश केला. त्या लोकांत अबुलहब हाहि होता. हा हजरत पैगंबर साहेबांचा नात्यांत चुलता होता; परंतु इस्लामधर्मामुळें तो त्यांचा कट्टा शत्रु होऊन गेला होता. त्यानें पैगंबर साहेबांचा जो छळ केला तो इतिहासांत सविस्तर वर्णिलेला आहे. त्याला हें आवडतच नव्हतें कीं, पैगंबर साहेबांनीं काबागृहांत नमाज पढावी व त्यांच्या मूर्तींस उणेपणा आणावा. त्याची बायको जिचें नांव उम्मेजमील होतें ती पैगंबर साहेबांच्या वाटेंत रात्रीं कांटें पसरत होती कीं ते इकडून जातील तेव्हां त्यांच्या पायांत कांटे रुततील. ह्याप्रमाणें या नवराबायकोच्या अदावतीचा पारच नव्हता. तर पैगंबर साहेबांनीं जेव्हां त्यांस उपदेश केला तेव्हां अबु—लहबनें हजरत पैगंबरांवर धोंडे उचलले व म्हणाला, हत् ! तुझा नाश जावो ! ह्यासाठीं का तूं आम्हांला तकलीफ दिली होतीस ? त्याच्या उत्तरादाखल हा अध्याय आला.

**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराच्या नांवानें (मी आरंभ करितों).**

**(जसें 'अबुलहब'नें पैगंबरास गालिप्रदान केलें होतें तसें उलट) 'अबु-लहब'चेच दोन्हीं हात तुटून गेले. आणि तो (आपणहि) नाश पावला. १. त्याची धनदौलत व त्यानें जें कांहीं संपादन केलें तें कांहींच त्याच्या कामा आलें नाहीं. २. तो लवकरच (नरकाच्या) डोंब वेणाऱ्या अग्नींत जाऊन दाखल होईल; ३. आणि (त्याच्या संगतीं)**

**त्याची बायकोहि, कीं जी लांकडें वाहून आणिते; ४. तिच्या गळ्यांत खजुरीच्या तंतूंची पीळ दिलेली दोरी असेल. ५.**

(१) 'हम्मालतुल–हतब'चा अर्थ लांकडें वाहणारी; आणि अरबीच्या वाक्-प्रचारांत लावालावी करणारी असाहि अर्थ होतो. तर ती चहाडी व लावालावी करीत होती म्हणून, अगर ती पैगंबर साहेबांच्या वाटेंत कांटे आणून पसरत होती, म्हणून किंवा ती खरोखरींच रानांतून जळण वाहून आणित होती म्हणून असें म्हटलें आहे. ह्या प्रकारच्या इशारती व गोष्टी भाषांतरांत येऊं शकत नाहींत.

(२) गळ्यांत दोरी असणें म्हणजे मुलें ज्याप्रमाणें कुत्र्याच्या पिल्लांच्या गळ्यांत दोरी बांधून फरपटत फिरतात तशीच पुनरुत्थानांत तिची फटफजिती होईल; व ती ह्यास पात्रहि होय. असें म्हणतात कीं, ती एके दिवशीं सर्पणाचा भारा डोकीवर उचलून येत होती; इतक्यांत भारा खालीं पडला व त्याची दोरी तिच्या गळ्यांत येऊन फास लागला व ती तेथेंच मरून पडली. सारांश, परमेश्वर व परमेश्वराच्या स्वकीयांच्या शत्रूंचा परिणाम असा वाईटच होतो.

# अध्याय ११२ वा.

# सूरतुल्–इखलास्.



हा अध्याय **मक्का** शहरीं प्रकट झाला. यांत ४ आयात–महावाक्यें आहेत. याचें नांव 'सुरतुल्–इखलास' म्हणजे शुद्ध व निर्मल भाव जो परमेश्वरासंबंधानें माणसाला ठेविला पाहिजे त्याचें प्रकरण असें आहे. कित्येक कुरेशी लोकांनीं हजरत पैगंबर साहेबांस येऊन विचारिलें कीं, तुह्मी ज्या 'अल्लाह' ह्मणजे परमेश्वराच्या उपासनेकडे आह्मांस पाचरण करितां तो कसा आहे, त्याचीं विशेषणें व गुण काय आहेत, तो काय खातो पितो, तो कोणापासून उत्पन्न झाला आणि त्याच्या सारखाहि कोणी आहे कीं नाहीं, हें आम्हांस सांगा. त्यावेळीं हा अध्याय प्रकट झाला. ह्यांत ज्या गोष्टींचें विवेचन झालें आहे त्या गोष्टी फारच मनन करण्याजोग्या आहेत. जगांत जितकीं प्रचलित भिन्न भिन्न मतें आहेत त्या सर्वांच्या संबंधानें यांत यथायोग्य व सत्य सत्य निर्णय आहे. पैगंबर साहे-





बांच्या हदीसप्रमाणें जो कोणी मनोभावानें हा अध्याय तीनदां वाचील त्याला समग्र कुराणाच्या वाचण्याइतकें पुण्य प्राप्त होईल. व मग स्वर्ग त्याच्या साठीं अवश्य ठेवलेलाच आहे.



**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराचे नांवानें (मी आरंभ करितों).**



**(हे पैगंबरा! तुला हे लोक परमेश्वराविषयीं पुसतात, तर तूं यांना) सांग कीं, तो परमेश्वर[1] एक होय; १. परमेश्वर निरपेक्ष[2] होय; २. त्याच्या पासून कोणी जन्मला[3] नाहीं. व तोहि कोणापासून[4] जन्मला नाहीं. ३. आणि त्याच्या तोडीचा[5] कोणी एकहि नाहीं. ४.**

---

(१) म्हणजे तो व्यक्ति व सामर्थ्याच्या मानानें एकच आहे. कोणीहि त्याचा अंश किंवा अवतार नाहीं.

(२) त्याला कोणाच्याहि मदतीची अपेक्षा नाहीं. पण सर्वांस त्याच्या मदतीची व कृपेची अपेक्षा आहे. ह्मणून तो स्वयंभू, नित्यसिद्ध व अविनाशी आहे.

(३) 'त्याच्या पासून कोणी जन्मला नाहीं; ह्मणून प्राचीन नास्तिकांच्या मताप्रमाणें देव दूत परमेश्वराच्या मुली नाहींत व **पौल**मतानुयायी ख्रिस्त्यांच्या मतान्वयें **येशू**-**ख्रिस्त** हा त्याचा पुत्र नाहीं.

(४) 'तोहि कोणापासून जन्मला नाहीं;' ह्मणून ख्रिस्त किंवा आमच्या येथील **सनातन हिंदु** मताप्रमाणें **श्री**कृष्ण, **राम**, **म**हादेव वगैरे ज्ञानी संतांच्या विभूती, ज्यांचा जन्म आईबापापासून झालेला आहे व एकें काळीं जगांत साधारण मनुष्यांप्रमाणें आयुष्यक्रमण करून जे शेवटीं मरणवश झाले आहेत त्यांस भगवान्, प्रभु अथवा साक्षात् परमेश्वर मानणें हें यथार्थ नव्हें.

(५) त्याच्या तोडीचा व बरोबरीचा कोणी एकहि नाहीं. म्ह**णून** अग्नि-पूजक पार्शांच्या मताप्रमाणें जसा **यज्ञ**दानाचा प्रतिस्पर्धी व विरोधी **अहरमन** आहे अथवा अनेकेश्वर मतवादी हिंदु लोकांच्या मतानुसार ईश्वरास शाप देऊन जेरीस आणणारे प्रतिस्पर्धी आहेत; तसा **अ**ल्लाह ह्मणजे सर्व गुणसंपन्न परात्पर परमेश्वराचा कोणी एकहि प्रतिस्पर्धी किंवा विरोधी नाहीं. अथवा निरीश्वर **बौद्ध** व **जैन** मता प्रमाणें **निर्वाण** किंवा कैवल्यपद प्राप्त करून कोणीहि परमेश्वराच्या बरोबरीचा होऊं शकत नाहीं; तल्लीनता व तद्रूपता प्राप्त झाल्यावर जर कोणाचेंहि वेगळें अस्तित्वच राहत नाहीं, तर त्याची व्यक्ति कोठून टिकणार? म्हणून त्याच्या तोडीचा कोणी एकहि नाहीं. परमेश्वर सर्व मानवांस आपलें खरें ज्ञान देऊन खऱ्या सन्मार्गाची सुबुद्धि देवो ! तथास्तु !




# अध्याय ११३ वा.

## सूरतुल्–फलक्.



हा अध्याय मदिनेंत प्रकट झाला. यांत ५ आयात–महावाक्यें आहेत. याचें नांव 'फलक' म्हणजे सकाळ असें होण्याचें कारण हें कीं ज्याप्रमाणें अभावांतून अस्तित्व होतें त्याप्रमाणें अंधःकारांतून प्रकाश बाहेर पडतो; आणि जो परमेश्वर हें घडवून आणितो तो रोग व भय वगैरे आपत्ति दूर करण्यासहि समर्थ होय. म्हणून त्याचा आश्रय मागणें हेंच उचित होय.

**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराचे नांवानें (मीं आरंभ करितों).**

**(हे पैगंबरा! तूं आपल्या संरक्षणास्तव अशी) प्रार्थना करीत अस कीं सकाळचा स्वामी (म्हणजे परमेश्वर) याचा मी आश्रय मागतों, १. (कीं) सर्व सृष्टीच्या अपायापासून, २. व काळोखी रात्र जेव्हां (तिचा काळेख वस्तूमात्रावर) पसरतो तेव्हां तिच्या अपायापासून; ३. आणि गंड्यांत (मंत्र पढून पढून) फुंकणाऱ्यां (म्हणजे जादुगरणीं)च्या**

(१) नास्तिक व मुख्यत्वेंकरून यहुदी यांचें वैर हजरत पैगंबरांशीं फारच वाढलें होतें. त्यांनीं हजरत पैगंबर साहेबांस विष दिलें व त्यांच्यावर जादु करविली. परंतु ज्याला परमेश्वर राखे त्याला कोण चाखे? शेवटीं लुबैद बिन आसम नांवाच्या यहुद्यानें आपल्या चेटकीणी मुलींच्या साह्यानें एका गंड्यावर मंत्र पढून ११ गांठी मारून तें चेटक एका विहिरींत दगडाखालीं दाबून ठेविलें; ह्यानें हजरत पैगंबर साहेबांची प्रकृति बिघडली व ते आजारी झाले. तेव्हां जिब्रील दुतानें ही सारी हकीकत पैगंबरांना कळविली व त्यांनीं आपले जावई हजरत अली यांस पाठवून त्या विहिरींतून त्याच जागेवरून तें चेटक आणविलें. परमेश्वरानें हा व पुढील अध्याय मिळून ज्यांत ११ आयात–महावाक्यें आहेत तीं प्रकटिलीं. जिब्रील दूत हीं महावाक्यें वाचीत जात होते व त्या चेटकांतील एक एक गांठ आपोआप सुटत होती; येथपर्यंत कीं ११ गांठाहि सुटून पैगंबर साहेब बरे झाले. यांत या वृत्तांताकडे इषारत आहे. या गोष्टीला कोणी धर्म भोळेपणा समजूं नये. ही मैली विद्या जाणणाऱ्या स्त्रिया आपल्या हिंदुस्थानांत मुख्यत्वेंकरून गुजराथ व तेलंगाणा प्रांतांत पुष्कळ आहेत व असल्या गोष्टी तेथें कोर्टापर्यंत गेल्या आहेत. तात्पर्य, हे मलीन व अशुद्ध इच्छा शक्तीचे परिणाम होत. याला इंग्रजींत ब्लॅकआर्ट Blackart म्हणजे चेटक वा जादु असें म्हणतात.

अपकारापासून, ४. आणि हेवेखोर जेव्हां हेवा करूं लागतो तेव्हां त्याच्या अपायापासून (तो मला वांचवील). ५.

# अध्याय ११४ वा.

## सूरतु--न्नास.



हा अध्याय मागील अध्यायाबरोबरच मदिनेंत प्रकट झाला. यांत ६ आयात-महावाक्यें आहेत. याला 'सूरतु-न्नास' म्हणजे माणसाचें प्रकरण म्हणतात. कारण यांत परमेश्वरानें माणसाशीं आपले जे जे संबंध आहेत ते दर्शविले आहेत.

**परम दयाळू (आणि) कृपाळू परमेश्वराचे नांवानें (मी आरंभ करितों.)**

**(हे पैगंबरा ! तूं आपल्या संरक्षणासाठीं अशी) प्रार्थना करीत अस कीं मी मनुष्याच्या पालनकर्त्याचा आश्रय मागतों; १. (म्हणजे) मनुष्याच्या बादशहाचा, २. मनुष्याच्या उपास्य (परमेश्वरा)चा, ३. (कीं सैतान) जो लोकांच्या उरांत दुष्ट विचार ध्वनित करितो (व खुद्द) दिसून येत नाहीं त्याच्या अपकारा पासून (तो मला वांचवील.) ४-५. (हे दुष्ट विचार ध्वनित करणारे) 'जिन्न'—दैवत व मनुष्यें यांच्या कोटींतलेहि (असतात.) ६.**

(१) ह्यांत मनुष्याचा पालनकर्ता, मनुष्याचा बादशहा व मनुष्याचा उपास्य हीं परमेश्वराचीं तीन विशेषणें इतकीं व्यापक आहेत कीं, त्यांत परमेश्वराच्या मनुष्याशीं असलेल्या सर्व संबंधांचा समावेश होतो. तो त्याचें फार प्रेमानें व दयेनें पालनपोषण करितो. तो त्याचा बादशाह म्हणजे सर्वस्वाचा मालक आहे व मनुष्याला त्यानें जी जी योग्यता दिली आहे त्या योग्यतेप्रमाणें त्याच्या हातून कर्में घडतात व यालाच दैवगति व कर्मगति ह्मणतात. ही कर्मगति समजण्यासाठीं पुनर्जन्म मानण्याची आवश्यकता राहात नाहीं. कारण योग्यतेची योजना व्यवहारबुद्धीस अनुसरती आहे. ह्मणून यानें कर्माचें कोडें व मानवी स्थित्यंतराचें गूढ सहजगत्या लक्षांत येतें. ज्या परात्पर परमेश्वराचे हे गुण आहेत तो मनुष्याच्या उपासनेसहि स्वतंत्रपणें योग्य आहे. म्हणून त्याचा आश्रय घेतला ह्मणजे सर्व दुःख हरण होतात.